## - प्रस्तावना -

इंग्लीश नाटककार शेरीडन् यांच्या सुप्रसिद्ध 'स्कूल फॉर स्कांडल' (School for Scandal) नामक नाटकाचें मुख्य संविधानक (त्यांत कांहीं अवश्य असा फेरफार करून) आधार म्हणून घेऊन (त्यास स्वकल्पित असा बराच भाग जोडून आपल्या हिंदु समाजास लागू पडेल असें हें नाटक मी रचिलें आहे.

नाटकाचे मुख्य दोन उद्देश उपदेश व करमणूक हे या ग्रंथ वाचनानें सफल झाले तर माझ्या श्रमाचें चीज झालें असें मी समजेन.

ग. सो. त्रि.

ग्रंथकर्ता.

मुंबई ता०
सपटेंबर १९१०.

# 'ढोंगी दुनिया'

## अर्थात्

## 'जें सारें चकाकतें तें सोनें नव्हे.'

(लेखक-रा. गणपतराव सोकरजी त्रिलोकेकर.)

### पात्रें.

तात्यासाहेब........................एक श्रीमान गृहस्थ.
काकासाहेब........................त्यांचे नातलग व मित्र.
नानासाहेब........................ } काकासाहेबांचे पुतणे.
बाळासाहेब........................ }
विसाजीपंत........................तात्यासाहेब व काकासाहेब यांच्या समाईक पेढीचे जुने व विश्वासु मुनीम.
पुरनमलजी........................वेषधारी काकासाहेब.
धनाजीराव........................वेषधारी काकासाहेब.
अण्णासाहेब........................तात्यासाहेबांचे ( दुसऱ्या संबंधाचे ) मेहुणे.

बाळासाहेबांचे मित्र, व्यापारी मंडळी, महाराज, शिष्य, भक्तमंडळी, पुराणीक, पोलीसचे जमादार वगैरे मंडळी.

आनंदीबाई........................तात्यासाहेबांचें दुसरें कुटुंब.
सुशीला........................तात्यासाहेबांची ( पहिल्या संबंधाची ) मुलगी.
गजरी........................तात्यासाहेबांच्या घरांतील मोलकरीण.

रमाबाई, उमाबाई, अन्नपूर्णाबाई, सावित्रीबाई इ० पुराण श्रवण करण्यास येणाऱ्या स्त्रिया वगैरे.

# 'ढोंगी दुनिया'

## अर्थात्

## 'जें सारें चकाकतें तें सोनें नव्हे.'

### अंक १ ला.—प्रवेश १ ला.

**स्थल**—( तात्यासाहेबांचा वाडा )—बाळासाहेब व सुशीला.

**बाळासाहेब**—( पत्र वाचतां वाचतां ) शेवटीं तात्यासाहेबांनीं आपला हेतु सिद्धीस नेलाच म्हणायचा ! ताई, हें त्यांचं पत्र, आतांच आलं. घे, वाच तूं. तुझ्या मनाला कदाचित् वाईट वाटेल म्हणूनच त्यांनीं तें मला लिहिलं असावं. ( पत्र देतो ).

**सुशीला**—( वाचून रागानें ) सत्यानाश होवो मेल्यांचा ! घातली शेवटीं मेल्यांनीं बाबांना भुरळ व घातलं त्यांच्या गळ्यांत घोंगडं ! बरं बरं, बाईसाहेबांना म्हणावं माझ्याशीं गांठ आहे ! मेल्यांना इकडे नाहीं साधलं, म्हणून बाहेरगांवीं बाबांना नेऊन त्यांनीं [illegible] फसविलं !

**बाळा०**—ताई, हें असं वेड्यासारखं काय बोलतेस ! यांत त्यांचा काय बरं वांक ? त्यांनीं पुष्कळ सांगितलं, पण तात्यासाहेबांनीं विचार करायला हवा होता. या वयांत आणि असलं अविचाराचं काम !

**सुशीला**—किती कावेबाज तरी माणसं ! इकडे आपण मोडतं घालीत असूं म्हणून त्यांना तिकडे बोलावून नेऊन आपला हेतु साधून घेतला ! मेल्यांनों, खऱ्या छातीचे होतेत तर इकडेच कां नाहीं लग्न केलंत ! बिशाद काय होती ! बरं, पण एवढ्यांत काय झालं ! सर्वच जिंकलं असं नाहीं !

**बाळा०**—आतां आपल्या जिवाला संताप करण्यांत हांशील काय ! झालं तें कांहीं फिरत नाहीं. आतां पुढें कसं काय करायचं याचा विचार.

**सुशीला**—पुढें काय करायचं ! मी तिला आई ह्मणून कध्धीही मानणार नाहीं. मग कांहींही होवो.

**बाळा०**—छट्! वेडी आहेस तूं ! तसं केल्यानें तात्यासाहेबांना किती त्रास होईलं याचा विचार केलास का ? एक तर, त्यांनीं करूं नये पण केलं हें अविचाराचं काम ! व त्यामुळें त्यांना त्रास होणार खचित ! त्यांत आणखी तुझ्याकडून भर पडली म्हणजे त्यांच्या हालास पारावार रहाणार नाहीं. आतां हें स्वाभाविक आहे कीं, तुला नवीन नवीन वाईट वाटेल. या नव्या आईशीं तुझें कधींमधीं पटणारही नाहीं, परंतु सहवासानें व समजुतीनें सर्व कांहीं जमवून घेतां येईल.

**सुशीला**—तें मात्र दादा मला सांगूं नकोस ! ती बाई तुझ्या किंवा माझ्या परिचयांतली नाहीं असं नाहीं. आपण तिला चांगली ओळखतों. काय तो तोरा ! केवढी ती आपमतलबी ! कज्जेखोर तर पहिल्या प्रतीची ! त्यांत " जिनें पाहिला नाहीं अंधा तिनें पाहिला दिवा. " तिला तर आतां स्वर्ग दोन बोटें उरल्यासारखं झालं असेल.

**बाळा०**—तूं म्हणतेस तें कांहीं अंशीं खरं आहे ! परंतु गोष्ट एकदांची झाली ! तात्यासाहेबांनीं आपणांस तसेंच बोलत ठेवून तिला आपली पट्टराणी केली ! तेव्हां त्यांच्यासाठीं तरी तिचा योग्य मान ठेवणं आपणांस भाग आहे. ( थट्टेनें ) अग आतां तिच्या समोर हात जोडून उभं राहिलं पाहिजे ! काय समजलीस ?

**सुशीला**—दादा तुला मस्करी करायला काय झालं. बरोबरच आहे. अंगावेगळा घाय ! पुन्हा तुमचं ठीक आहे. काकासाहेब लवकरच इथं परत येणार ! ते आले ह्मणजे तुह्मी तुमच्या ठिकाणीं जाल ! मला मात्र तिच्याशीं जन्म काढावा लागणार !

**बाळा०**—कां बरं ? तुला पण घेऊन जाणारा कोणी त्यार होईल ! कोणी कां ? ( हांसतो )—खरं कीं नाहीं ?

**सुशीला**—दादा ही वेळ अशा गोष्टी करण्याची का ?

**बाळा०**—अग दुःखांत सुख दुसरं काय !

**सुशीला**—खरंच, आतां दुःखाचे दिवस आले आहेत खरे ! ( पत्र उघडून ) आणखी

चघ दादा. पत्रांत आमच्या या नवीन राणीसाहेबांचे काय काय हुकुम सुटले आहेत ते! अरे! अरे! बाबांना हें असं लिहिणं कसं तरी शोभलं? ऐक दादा. बाबा लिहितात, (वाचते) "तिच्या इच्छेप्रमाणें वरची बंगली साफ करून तेथें तुझ्या आईच्या खोलींतील सर्व सामान नेऊन ठेवावें!" हर हर! बाबाच का हें लिहितात? बाबा! तुम्हांला कांहींच का वाटूं नये! व तें पण कोणाला सांगायचं! मला? हें करतानां माझ्या मनाची काय स्थिति होईल याचा तुम्हीं कांहींच विचार केला नाहीं ना? पण तुम्हांला आतां माझी आठवण कशी होणार? या नव्या मोहजाळांत सांपडलां आहांत ना! तेव्हां तुम्हाला तरी दोष कां द्यावा?

**बाळा०**—पुरे कर! तूं कांहीं लहान नाहींस! जगाचा अनुभव नसल्यामुळं तुला या सर्व गोष्टींचं नवल वाटत आहे. परंतु हें सारं साहजिक आहे. तात्यासाहेबांनीं हा संबंध केला तो स्वतांच्या सुखासाठीं ना?

**सुशीला**—हो खरंच. आपल्या सुखासाठीं व माझ्या जाचासाठीं.

**बाळा०**—छट्, तुला त्रास व्हावा असं त्यांच्या स्वप्नींही नसेल. पण एकाचा लाभ तो दुसऱ्याचा तोटा या नियमाप्रमाणें त्यांनीं या नवीन जोडलेल्या संबंधामुळें तुला त्रास तर होईलच. आतां तो जितका कमी होईल तितकें करणें हें तुझ्या हातीं आहे. पण जरा धीर धर, मी तात्यासाहेबांना चांगला ओळखतों. त्यांचा तुझ्यांत जीव आहे. तेव्हां तेही जपूनच वागतील. तुला जाच झालेला त्यांच्यानें बघवेल का?

**सुशीला**—मी ही तसंच समजत होतें. व पाहिलं असतां आई वारल्यापासून बाबांनीं मला अशा रीतीनं वागविलं कीं आईची आठवण कशी ती पडली नाहीं. व त्यांच्या जोरावर मी किती तरी उडत होतें पण आज त्या सर्वांचा अंत झाला! आई! आई! (रडते.)

**बाळा०**—सुशीले हें काय? वेडी कोठची! धीर धर, परमेश्वर समर्थ आहे! घटकाभर तात्यासाहेबांनीं अविचाराचं काम केलं म्हणून धरूं. पण म्हणून काय झालं! त्यांच्या हातून तुला जाणून बुजून त्रास होईल असं मला बिलकूल वाटत नाहीं. भिऊं नकोस. ईश्वर करील तर सर्व कांहीं ठीक होईल! आणि तशांत, कांहीं कमी जास्त झालंच, परमेश्वर न करो, आणि तसा प्रसंग आलाच तर मी तुला एक क्षणभरही त्रासांत राहूं देईन असं तुला वाटतं काय?

**उमाबाई**—अहो, मोठ्यांची कास धरून राहिल्याखेरीज आपणासारख्या गरीबांचं कसं पार पडणार! खरं कीं नाहीं ?

**कृष्णाबाई**—होय तर, सरस्वतीबाईच माझं सगळं पुरं पाडताहेत. आणि खरं म्हणाल तर या मोठ्या लोकांकडे उगीच आपण जीव तोडून जावं यावं. मतलबा-पुरत्या ' या रमाबाई ' ' या विठाबाई ' म्हणतील, पण थैलीच्या दोऱ्या सुटणं फार कठीण बरं ! दमडी सुटेल तर शपथ !

**उमाबाई**—तुमच्या बाई या वादांत आनंदीबाईची गोष्ट तशीच राहिली. तात्या-साहेबांनीं एकदम घाईघाईनं लगीन लाविलं यांतलं इंगित काय बरं असावं ?

**रमाबाई**—अहो इंगीत तें काय असणार ! झाला विचार आणखी काय ? तुमचा बाई भारी संशयी स्वभाव ! कंसासारखा तुह्माला जिकडे तिकडे कृष्णच दिसतो !

**उमाबाई**—राहिला बाई आमचा संशयी स्वभाव आमचेकडे. पण लगीन होऊन पुरे चार महिने नाहीं झाले, तों लागले लोक चर्चा करायला.

**रमाबाई**—लोकांना बाई चर्चा करायला काय झालं, एवढंसं निमित्त पुरे होतं.

**उमाबाई**—अहो पण लोक काय चर्चा करायला लागले ? असं काय झालं ?

**जानकी०**—आणखी तें काय व्हयाचं ! म्हातारा नवरा व तरणी बायको यांच्या मध्यें जें होतें तेंच ?

**कृष्णाबाई**—लग्नाची हळद देखील निघाली नाहीं तोंच !

**उमाबाई**—आणि मुलगीही परक्यांतली नव्हे हो ! तात्यासाहेबांच्या अगदीं परि-चयांतली !

**जानकी०**—तरीच मी ह्मणत होतें तसलं कांहीं असावं. ऐकलं का वाराणशीबाई काय ह्मणतात तें ! उगीच नाहीं तात्यासाहेबांनीं घाइघाईनें लगीन केलं ! अहो. त्यांत गोम आहे गोम !

**रमाबाई**—कसची गोम आणि कसचं काय ? आणखी त्यांत वावगं तें काय झालं ? तात्यासाहेब अजून चांगले धडधाकड आहेत. पण अगदीं जख्खड थेरड्यांनींही नात शोभेल अशा कोंवळ्या पोरीशीं लगीन लाविल्याचीं आपण किती तरी उदाहरणें पहातों !

**वाराणशीबाई०**—तसं नव्हे. त्यांचा दुसऱ्यानें लगीन करण्याचा विचार होता कुठं? छातीवर उपवर पोरगी होती ना!

**उमाबाई**—मग हें जमलं कसं?

**वाराणशी०**—इथं कुणी परकी नाहींना? हो बाई, मेलं नसतं विघ्न ओढून आणावं कुणी? खरं खोटं त्या भगवंताला माहीत! पण लोक ह्मणतात तात्यासाहेब आनंदीबाईकडे लग्नापूर्वी जात येत असत!

**उमाबाई**—अगबाई खरंच कीं काय?

**कृष्णाबाई**—अहो हे मोठे मोठे प्रतिष्ठित ह्मणवून घेणारे लोक असेच! नांवाच्या जोरावर त्यांनीं केलेलं सर्व कांहीं खपतं.

**रमाबाई**—छी: छी: उगीच ही नालस्ती.तात्यासाहेब तशांतले नव्हत हें कोणीही सांगेल.

**उमाबाई**—तुम्ही म्हणतां तसंही असेल बाई. या मोठाल्या वाढलेल्या पोरी काय नाच घालतील नी काय नाहीं याचा नेम नाहीं.

**रमाबाई**—बरं पण आतां त्याचं काय? तो मागला घोंटाळा झाला. लगीन पण होऊन गेलं! त्याचं आतां काय?

**जानकी०**—अहो तेवढ्यांतच काय झालं. खरी गम्मत तर पुढें आहे.

**रमाबाई**—गम्मत हो त्यांत कशाची! लोकांची निंदा करण्यांत व ऐकण्यांत गम्मत खरी!

**जानकी०**—बरं बाई तुम्हांला गम्मत नसेल वाटत तर कानांत बोटें घाला! सांगाहो वाराणशीबाई पुढली गम्मत.

**उमाबाई**—हो हो! सांगाच बाई. या मोठ्या लोकांचीं कर्मेंच अशीं! मोठेपणांवर शोभून जातात इतकंच.

**वाराणशी०**—त्या दिवशीं कीं नाहीं त्यांच्या येथला स्वयंपाकी ब्राम्हण आमच्या ठकीच्या सासरीं गेला होता. ठकीच्या सासूला कीं नाहीं सगळ्या गांवच्या नसत्या उठाठेवी. आणि अशी कांहीं गमतीची बाबत असली म्हणजे बोलूंच नका. त्यांनीं त्या भटाला आंतून बाहेरून सगळ्या तऱ्हेनें जसा एखादा वकील उलट सुलट तपासणी करतो कीं नाहीं त्या सारखं हें विचार, तें विचार असें करून

अगदीं कोरडा ठणठणीत करून सोडला. त्यांच्या घरची वित्तंमबातमी काढून घेतली.

**रमाबाई**—ती तुमच्या ठकीनें ऐकली, ती तुम्हांला सांगितली, आणि ती तुह्मी आम्हांला सांगणार. वाहवा ! येतां येतां ती बातमी किती तरी फुगून गेली असेल ?

**जानकी०**—अहो पण त्या भटानें काय काय सांगितलं तें तर कळूंद्या.

**वाराणशी०**--अग बाई बाई, तुह्मी भारीच बाई उतावळ्या. दुसऱ्यांच्या गोष्टी वार्ता आपल्याला कशाला हव्या परत्या. मला कीं नाहीं आपण भलं आपलं काम भलं ! तिसरी दिशा ठाऊक नाहीं. दुसऱ्याच्या कामांत ढवळाढवळ कशास हवी !

**रमाबाई**—ऐका हो ! यांना दुसऱ्याच्या कामांत स्वतां ढवळाढवळ करणं पसंत नाहीं. मात्र स्वताच्या मुलीनं तशा रीतीनं मिळविलेल्या माहितीचा लाभ घेण्याला हरकत वाटत नाहीं. ठीक ठीक ! असा बरा भोळा भाव सिद्धीस जाव.

**जानकी०**—सांगाहो तुमचा स्वयंपाकी ब्राह्मण काय म्हणत होता तें.

**रमाबाई**—थांबा, अहो थांबा, या स्वयंपाकी भटांवर आणखी भटणीवर कध्धीं विश्वास ठेवतां कामा नये बरं. खाल्ल्या घरचे वासे मोजणें या कामांत त्यांचा हातखंडा अगदीं जसा. यजमानाचें अन्न खावें आणि त्याचीच नालस्ती करावी हाच त्यांचा उद्योग. लावालाव्या करून या लोकांनीं शेंकडों घरें फोडलीं असतील !

**कृष्णा०**—स्वयंपाकी वर्गानें याबद्दल आपणांवर अब्रूनुकसानीसाठीं फिर्याद केल्यास नवल नाहीं !

**जानकी०**--तसं झालं तर यांना करूं पुढं ह्मणजे झालं कीं नाहीं !

**रमाबाई**—शाबास बाई ! गम्मत ऐकण्यास तुह्मी सगळ्या आणि प्रसंग आला तर तोफेच्या तोंडीं मी ! बरं बाई ! तो वेळ येईल तेव्हां पाहूं.

**वाराणशी०**—ऐकलं का ? तो ब्राह्मण ह्मणे–घरांत तात्यासाहेब नी बाईसाहेब नी सुशीलेचीं दररोज भांडणें व तंटे ! तात्या साहेब इतक्यांतच झाले आहेत पक्के बाईलबुद्धे.



**जानकी०**—न होतील तर नवल. बया आहेच तशी पराक्रमी.

**वाराणशी०**—बयासाहेब खुशाल तात्यासाहेबांस बोलत ठेवून मन मानेल तशा

वागतात. पाहिजे तसा खर्च करतात. तिकडल्या मंडळीचा हळुहळू शिरकाव होत चाललाच आहे. सारांश, असंच आणखी कांहीं दिवस चालल्यास तात्यासाहेबांच्या संसाराची माती होणार—माती.

**कृष्णा०**—कांहीं होत नाहीं, हें असंच चालायचं व तात्यासाहेबांस निमुटपणें सगळं सोसावं लागणार!

**उमाबाई**—अहो कोणी ह्मणतात सुशीलेला आनंदीबाईनें रातोरात घरांतून निघून जाण्यास सांगितलें, आणि सुशीला तशीच तिच्या आजोळीं निघून गेली.

**रमाबाई**—छेः छेः गोष्ट अगदीं खोटी. कालच सुशीलेकडून आमच्या कुशीला बोलावणं आलं होतं. लोकांच्या गोष्टी! पिसाचा कावळा करायला वेळ लागतो का? त्यांना एवढंसं निमित्त मात्र हवं.

**कृष्णा०**— पुरे बाई. आज पुराणिकांचं पुराण ऐकण्याऐवजीं हें आपलंच पुराण झालं.

**रमाबाई**—तें ऐकून कांहींतरी पुण्य पदरीं पडलं असतं. या पुराणानें लोकांची निंदा मात्र झाली. चला बाई. पुण्याचे दोन शब्द तरी कानीं पडूं द्या. —

[ पुराण ऐकूं लागतात. पुराण चालू. बायांचा मधून मधून गलबलाही चालू आहे. ]

---

## अंक १ ला--प्रवेश ३ रा.

( तात्या साहेबांचा वाडा ).

**आनन्दीबाई०**--( रागानें ) अरे राम्या, गण्या, संभ्या, काय मेला चमत्कार तरी! मेले गेले कुठं सगळे! एक जण पण हांक द्यायला नाहीं! अग गजरे—ती पण मेली कुठं नाहींशी झाली! गेली असेल मेली त्या सुशीलेजवळ! मेली लुबरी पहिल्या प्रतीची! मेल्यांना अजून कळतंय कुठं घराची मालकीण कोण ती! मी म्हणजे केर कीं कचरा! तिची थुंकी झेलायला कसे तयार! पण थांबा मेल्यांनो, तुम्हां सगळ्यांना चांगली शिकवितें—त्या कारटीचं चालतं कीं माझं चालतं तें पहातें! पहा अजून कोणी एक तरी येतोय का? गजरे—अग गजरे—

( गजरी धांवत धांवत येते ).

**गजरी**—बाईसाहेबांनीं मला हांक मारली वाटतं?

**आनंदी०**—अजून वाटतयच का ? मेले ओरडून ओरडून घसा पण कोरडा पडला ! कुठंग गेली होतीस ?

**गजरी**—कुठं नव्हतं इथंच होतें. जरा धाकट्याबाई साहेबांचं–

**आनंदी०**—धाकट्या बाईसाहेब ? कोठच्याग धाकट्या बाईसाहेब आणल्यास ? मेले, तुला कितीदां सांगितलं कीं या घरांत बाईसाहेब एकच ! धाकट्यान् थोरल्या कांहीं नाहीं ! ऐकूं आलं कीं कानांत उकळतं तेल घालूं ?

**गजरी**—व्हय ! व्हय ! ऐकलं कीं ! अन् त्याला नाय कोन म्हनतय ! थोरल्या बाईसाहेब आपुनच !

**आनंदी०**—मेले तुझं पुन्हा तेंच तेंच ! मेली अशी नाहीं तुला आठवण रहायची. पुढें ये कशी–( कानउपटून ) आतां राहील कीं नाही आठवण ? या घरांत बाईसाहेब एक–न् ती मी–समजलीस ?

**गजरी**—( कान चोळीत ) व्हय ! व्हय ! व्हय ! बाईसाहेब आपुनच ! आम्हासनी काय ! बोलून चालून आमी चाकुर मानसं ! राणीसाहेब म्हनांयासनी सांगाल तरी तसंही म्हनू—

**आनंदी०**—चल मेले ! निलाजरी कुठची ! बरं गजरे, तो बाबुलनाथाजवळ कोठेंसा बुबा कीं साधुमहाराज आला आहे त्याचेबद्दल चवकशी केलीस का विसरलीस ?

**गजरी**—विसरली नाहीं बरं का ! तसाच वेळ काढून रात्रीं गेलें होतें. पण तिकड ही माणसाची अकशी गरदी. मारे रगडा. त्यांत म्हातारे-जवान-पोरं-बोलायची सोय नव्ह ! बाया माणसं तर पुसूंच नका ! मी तर गांगरून थीकडनच परत आलें. पन सगळ्या रस्त्याभर बुवाम्हाराजाच समद्यांच्या तोंडामंदी नांव. एक म्हने वीस वरीस एका बाईला पोरबाळ नव्हतं-तें म्हाराजाच्या प्रसादानं चार दिसांत-चिन्ह दिसायला लागलं ! कुनी म्हने-म्हाराजांनीं नुसता डोळ्यावरून हात फिरवून एका आंधळ्याला डोळस केला !

**आनंदी०**—बरं, बरं, तुझं चऱ्हाट पुरे कर. मी कांहीं वांझ नांहीं नीं आंधळीही नाहीं.

**गजरी**—व्हय, पन पुढलं ऐकलंय कुठं ? माझ्या बाजूनं दोन बाया चालल्या होत्या. आई लेंकी होत्याशा दिसतै. त्यांचं बोलणं ऐकून तर मी अगदीं चकित झालें.

**आनंदी०**—असं काय त्या ह्मणत होत्या ?

**गजरी**—पोरीचा नवरा होता वाटतं बाहेरख्याली! बायकोला जाच करी. मारहाण करी ! पण बुवाह्माराजांनीं इभूत किं अंगारा दिला. तो नवऱ्याला खावविला कीं त्याच्या उशाखालीं किति दिस ठेविला-तेवढं मात्र बराबर ऐकलं नाहीं. अन् बघा झाला नवरा अगदीं कुतऱ्यावानी ! ऊठ ह्मणेल तर ऊठ, बस ह्मणेल तर बस; अगदीं हातामंदी ! अन् नवरा ऐकलं तर अगदीं उतार वयाचा व बायकु ह्मनाल तर कशी फांकडु ! आपल्यावानी! त्या बायाचं बोलणं ऐकलं तंव्हां मला तुमची आठवण झाली !–

**आनंदी०**—ह्मणजे ग मेले ?

**गजरी**—नव्ह उगीच-थट्टेनं बोललें ! काय नाहीं त्याच्यांत!

**आनंदी०**-- सांगत्येस कीं नाहीं ? का चौदावें रत्न पाहिजे ? ( पुन्हा कान उपटण्यास पुढें येते. )

**गजरी**—नका ! नका ! सांगत्यें मी. हें बघा राग येऊं देऊं नका. आमी चाकूर माणसं रात्रंदिवस तुमच्यासंगं वागतों तंव्हां डोळे कान वंध का असत्यात! घरांत काय चालतं तें सगळं आमी जाणून असतों. अव तात्यासाहेबांची नि आपली दररोजची घिसाघिस आमच्या नजरेस का येत नाहीं ? आनी सुशीलाबाई तुह्मांसनी अक्षी पाण्यांत बघतात. हें आमाला समजत नाहीं व्हय ? चाकुरमाणसं झालों ह्मणून काय झालं ? अन्न खातों ना ? देवानं अक्कल दिली ती काय खाया पुरती !

**आनंदी०**—तूं जबरी खरी! बरं तर गजरे, मला या बुवाची एकदां भेट घ्यावयाची आहे. पण ती गोष्ट तुझ्या व माझ्या खेरीज तिसऱ्या कानाला कळली नाहीं पाहिजे. कां ग मान कां हालविलीस ? हें बघ, हें काम तुझ्या मदतीशिवाय होणंच नाहीं !

**गजरी**—तें खरं पण तात्यासाहेबांना कळलं तर माझ्या पोटावर पाय येईल ना !

**आनंदी०**—हात्तिच्या, एवढीचना भीति तुला ? त्याविषयीं तूं निर्धास्त ऐस ! आलाच तसा प्रसंग तर तुझ्या अन्नापाण्याची मी दुसऱ्या रीतीनें तजवीज करीन. पण हें बघ तसा प्रसंगच येणार नाहीं कधीं.

**गजरी**—तुमी लागेल तें म्हना पण माला भय वाटतं ! तात्यासाहेबांशी गांठ आहे बरका ! नका माला उगीच मोहांत टाकूं !

**आनंदी०**—गजरे ! वेडी तर नाहीं झालीस तूं ? तुझी मी इतकी खातरी करीत असतां-ना तुला भीति कसची ? बाहेर पडलं तर मी माझ्यावर सर्व जबाबदारी घेईन ! मला ते काय करणार ! गजरे, मी खरंच सांगतें ! आणि त्याबद्दल आधींच तुला मी ही आंगठी देतें घे ! आतां तरी खातरी झाली ? ( आंगठी काढून देऊं लागते ).

**गजरी**—नका, नका. ती मला कशास हवी. राहूंद्या आपल्यापाशीं. ( आनंदीबाई बळेंच तिच्या हातांत देते)–बघा बाई तुम्ही ! मी तुमच्यावर विश्वास कां ठेवीत नव्हतें ? पण यांतून कांहीं भलतंच झाल्यास मला गरीबासनी दोन्हीकडून लाथा बुक्या मिळतील ! आणखी काय !

**आनंदी०**—कांहीं नाहीं ! त्याचं जोखीम माझ्यावर ! मग केव्हां जायचं तिकडे ?

**गजरी**—थांबा ! मला नीट विचार करूं द्या. घाईनं केलेलं काम कच्चं. काम करून असं तसं काम करणारी मी नाहीं. दोन घटका विचार करूं द्या.

**आनंदी०**—बरं तर ! जा तूं आतां ! तुला आज कोणी काम सांगूं नये म्हणून सगळ्यांना सांगतें–तूं जा–( गजरी जाते ). मेली लबाड पहा कशी ती ! पिवळं पिवळं दिसल्याबरोबर गेली सगळी भीतिबिती पार पळून ! पण इचा विश्वास धरावा काय ? नाहीं तर मेली देईल आग लावून ! व मजा बघायला तयार होईल !

( नानासाहेब येतात ).

**नानासाहेब**—कां आईसाहेब, विचार कसचा चालला आहे ?

**आनंदी०**—कांहीं नाहीं. विचार कसचा ! ( स्वगत ) या माझ्या बेतास यांची मदत मिळाली तर कसं ! यांची–धर्म–पोथ्या–पुराणांचीं बरींच थोतांडें आहेत; तेव्हां यांचा या गोष्टीवर विश्वास असेलच ! कदाचित् ते त्या बुवामहाराजास भेटूनही आले असतील. सहज विचारून तर पहावं. ( उघड ) नानासाहेब, मी ऐकतें आज पुष्कळ दिवस झाले इथें कोणी देवीभक्त बुवा आले आहेत ! मोठे सत्वशील आहेत, व पुष्कळ लोकांना त्यांच्या चमत्कारांचा अनुभवही आला आहे ! खरेंच कीं काय ?

**नाना०**—अहो म्हणतातना 'बहुरत्ना वसुंधरा '–या भूतलावर काय काय प्राणी

आहेत. अशा पैकीं आला असेल एखादा साधुपुरुष ! कुठें आला आहे तो ? अशा पुरुषाचं दर्शन म्हणजे एक मोठा अलभ्य लाभ !

**आनंदी०**—कुठं बाबुलनाथापाशीं मठांत उतरले आहेत असें म्हणतात. नानासाहेब, माझं एक काम कराल का ?

**नाना०**—एक कां ? हा नानासाहेब सांगाल तें काम करण्यास तयार आहे ! हुकूम मात्र झाला पाहिजे.

**आनंदी०**—बरं तर. मी त्या बुवाविषयीं चवकशी करण्यास गजरीला धाडिली आहे ! माझे मनांत अशा सत्पुरुषाचें दर्शन घ्यावं असं फार भरलं आहे !

**नाना०**—वाहवा ! यांत काय वावगं ! असे साधु पुरुष नेहमीं भेटत नसतात व सर्व ठिकाणींही दृष्टीस पडत नाहींत. म्हणतात ना–'चंदनं न वने वने'. तात्या साहेबांनांही आपल्याबरोबर घेऊन चला !

**आनंदी०**—छेः ! छेः ! एक तर त्यांचा अशा लोकांवर फारसा विश्वास नाहीं. व अशा लोकांचीं थोतांडें माजण्यास बायका लोक मुख्य कारण होतात असं त्यांचं म्हणणं असतं–तेव्हां माझं जाणं त्यांना अगदींच आवडणार नाहीं ! अशा वहिम माणसास कोणी बाई सांगावें !

**नाना०**–हं, हं,समजलों–बरं तर. गजरी काय सांगते तें पहा व मला त्याप्रमाणें कळवा ! तात्यासाहेबांना सांगायची काय जरूर आहे ! मी येईन तुमच्या बरोबर ! हुकूम सुटायची खोटी–हा बंदा तयार आहे मान्य करायला ! अशा सत्कार्यी मदत नाहीं करायची तर केव्हां ! हरी, तूं समर्थ !

**आनंदी०**-बरं बरं ! मी तुम्हांला चांगली ओळखतें, नाहीं असें नाहीं ! मित्रं बालेण्यांत जसा कांहीं हातखंडा ! (जाते).

**नाना०**—साखरेचा खाणार त्याला देव देणार ! हें बरं झालं ! यांना माझ्या ओशाळींत ठेवण्यास ही चांगलीच संधि सांपडली ! व तीही आयतीच सांपडली ! आतां योग्य वेळीं याचा लाभ घेणें हें माझें काम ! (जातात).

———

# ' ढोंगी दुनिया '

## अर्थात्

## ' जें सारें चकाकतें तें सोनें नव्हे.'

( मागील अंकावरून पुढें चालू. )

## अंक १ ला—प्रवेश ४ था.

### तात्यासाहेबांचा वाडा.

( सुशीला आपल्या खोलींत कांहीं काम करीत बसली आहे ).

**आनंदी०**—( बाहेरून ) येऊं का आंत ?

**सुशीला**—कोण ? ( आनंदीबाईस पाहून ) वाः आंत येण्यास हुकूम का पाहिजे ?

**आनंदी०**—( आंत येऊन हसत ) हुकूम नको ! पण म्हटलं काय करीत असाल काय नाहीं. पुन्हा आतांच्या रीतीभाती काय असतील कोणास माहित ! ( खोलींतील जिनसा न्याहाळून ) महाल कसा पहा शोभिवंत करून टाकला आहे तरी ! खरंच बाई ! तुमची ठेवण्यारेवण्याची भारीच टापटीप दिसते ! कसं अगदीं जिकडचं तिकडे ! मेलीं कीं नाहीं हें कसं तें साधतच नाहीं ! ती हुशारी माझ्या आंगीं मुळींच नाहीं. कुठं तरी हें सगळें शिकल्यात ?

**सुशीला**—अं, समजलं. त्यांत काय मोठं आहे ! चार गोष्टी आईनं शिकविल्या त्या पडतात उपयोगी, झालं. या सगळ्या गोष्टीनें आईची पदोपदीं आठवण होते. आई, खरोखरीच ग तुझी पदोपदीं आठवण होते. ( रडूं लागते ).

**आनंदी०**—वाः वाः हें असं काय ! हें असं काय करतां वेड्यासारखं ! पुरे पुरे ! हळु हळु आतां विसर पाडला पाहिजे.

**सुशीला**—तें खरंच. तिचा विसर तर मला या जन्मांत पडणं नाहीं. पण तिची आठवण मला होऊं नये अशा हेतूनें आपले प्रयत्न चालले असतील तर ते मात्र व्यर्थ आहेत असें समजा ! फार कशाला ! आजपावेतों जें कांहीं झालें व हल्लीं जें चाललंय याचा परिणाम मला विसर पाडण्यासारखाच आहे. नाहीं बरं का ?

**आनंदी०**—मी बाई तुमच्यासारखी शिकलेली हुशार थोडचि आहे कीं तुमच्या अशा वकीली प्रश्नाचा जबाब देऊं शकेन! पण मी आपली भोळ्या भावानें ह्मणतें कीं–आतां तुमच्या सारखीनें तेंच नी तेंच घेऊन बसण्यापेक्षां–चार चौघांत हिंडावं फिरावं–दोन घटका गंमत करावी. मेला आपला बायकांचा जन्मच आहे काबाड कष्टांचा व त्रास काढण्याचा! त्यांत आपण होऊन आणखी त्रास कां आणावा! आहां इथं माहेरांत तोंपर्यंत काय भोगाल कराल तें खरं–पुढें मग संसारांत गुरफाटल्यावर मग तें सारं संसार सुखच!

**सुशीला**—(मनांत) हें आज आहे तरी काय! इतकी एकदम माया पाझरली कुठून? लक्षांत कांहीं येत नाहीं! असो! काय होतं तें तर पाहूं. (उघड) तुह्मी ह्मणतां तें खरं, पण—

**आनंदी०**—पणबीण कशाचा घेऊन बसलां. मी सांगतें तें ऐका. आणखी मी ह्मणतें, जरी तुमच्या आईची सर मला न आली तरी मी तुह्मांस त्यांच्या जागींच आहें ना? तर मग आपण दोघींनीं मिळून कां चालूं नये! मी आतां तुह्मांला परकी कां आहे? मला तरी इथं दुसरं कोण मायेचं आहे? चला असं वेडया सारखं कां करतां?

**सुशीला**—आपण ठीकच ह्मणतां पण सगळ्यांचं मन सारखंच असतं का?

**आनंदी०**—आणखी हें बघा सुशीलाबाई. मी ह्मणत होतें आतां तुमचं वय नाहीं का झालं—(इतक्यांत बाहेरून अण्णासाहेब येतात) अग बाई—हा कशाला आला?

**अण्णासाहेब**—(लगबगीनें) ताई–ताई–तूं आहेस तरी कोठें? इकडे शोधतों तिकडे शोधतों. कोठें मिळत नाहींस! शेवटीं गजरी ह्मणाली इकडे कदाचित असशील. ह्मणून येथें धांवत आलों. हा पहा दमही लागला.

**आनंदी०**—पण येवढी घाई कशाची? जा तूं वर. मी अमळशानें येतें.

**अण्णा०**—बरं तर. मी जातों. पण तूं लवकर ये बरं. मला फार वेळ थांबतां येत नाहीं. (जातांना) कां सुशीले ठीक आहेना?

**सुशीला**—हो बरं आहे. (अण्णासाहेब जातात.)

**आनंदी०**—किती तरी शर्मिष्ठ आहे आमचा अण्णा, पाहिलातना? तुमच्या समोर फार वेळ उभाही राहिला नाहीं, नाहीं तर सध्यांचीं पोरें किती तरी उर्मट! शाहाणाही तसाच आहे. आमच्या बाबांना त्याची किती तरी मदत आहे सांगूं! त्यांना आतां मेहनत का होते! शिवाय आमचा अण्णा कविताही चांगल्या लिहितो बरं!

**सुशीला**—हो ! परवांच बाळासाहेबांनीं मला थोड्या वाचून दाखविल्या खऱ्या. वाचतां-वाचतां-हंसून पोट दुखलं !

**आनंदी०**—आईच्या मनांत त्याचं एकदाचं लग्न करायचं फार आहे. पण त्याला बायको पाहिजे कशी ! देखणी-हुशार-घराणें चांगलं-अशी सगळ्या गुणांनीं संपूर्ण पाहिजे. माझे पाहण्यांत तर कोठें नाहीं. घटकाभर समजा अगदीं तुमच्यासारखी.

**सुशीला**—( मनांत ) आतां सगळं बाहेर पडलं ! या साठींच सारी खटपट !(उघड) अहो, तुमच्या अण्णाला बायकांची काय वाण !

**आनंदी०**—हें बघा सुशीलाबाई-तुमचं बरं वाईट पाहणार मीच ! रात्रंदिवस तुह्मांस चांगलं स्थळ मिळेल कसं याची मला काळजी लागली आहे. आतां तुह्मी उपवर झालांत. तेव्हां यापुढें तुह्मांला अशीच ठेवल्यास लोक मला हांसतील. मी तुह्मांला विचारतें-आमचा अण्णा येतो कां तुमच्या पसंतीला ? ( सुशीला कांहीं बोलत नाहीं असें पाहून )-हें बघा, जसं तुह्मी तुमच्या आईपाशीं खुल्या मनानें सांगितलं असतं तसं मला सांगा. माझ्यापाशीं लाजायचं काम नाहीं. खुलं सांगा. बरं-आजच पहिल्यानं गोष्ट काढली आहे, तेव्हां नका आज जबाब देऊं. मी विचारलं त्याचा विचार करा. पण माझं येवढंच ह्मणणं आहे कीं आमचा अण्णा केवळ टाकाऊ नाहीं. माझा आग्रह एवढ्याचसाठीं कीं असं सगळ्या रीतीनें चांगलं स्थळ नेहमीं मिळत नसतं. बरं तर, अण्णा वाट पहात असेल. मी आतां येतें. मी सांगितलेल्या गोष्टीचा विचार करा बरं. ( जाते. ) ( सुशीला विचारांत निमग्न होते. )

## अंक १ ला-प्रवेश ५ वा.

### [ तात्यासाहेबांचा वाडा. ]

**तात्या०**-(स्वगत) उतार वयांत दुसऱ्यानें लग्न करणें हें किती वेडेपणाचं व अविचाराचं काम आहे हें आतां दररोज माझ्या प्रत्ययास येत चाललं आहे ! हा दुसरा संबंध जोडण्यापूर्वी मी किती तरी सुखी होतों ! घरांत कशी स्वस्थता व शांतता होती ! केवढं समाधान होतं ! आणि आतां काय ! आज दोन महिने दररोज कांहींना कांहीं तरी भानगड उपस्थित होतच आहे ! मी आपल्याकडून हरतऱ्हेनें प्रयत्न करून पहातों पण तिचें व सुशीलेचें बागडणें बंद होतच नाहीं ! व तिच्या कागाळ्या व इर्चीं गाऱ्हाणीं ऐकतां ऐकतां मस्तक अगदीं वेडावून जातें ! बरं यांत वांक कोणाचा हें

पाहूं गेलों तर त्याचाही निर्णय करणं कठीण ! ठीकच आहे ! इला सर्वांच्या इच्छे-विरुद्ध घरांत आणल्यामुळें घरांतील माणसांस व विशेषेंकरून सुशीलेस फारच राग आला आहे. तिच्या स्वतंत्रतेवर पाणी पडलं यांत संशय नाहीं. ती आतां कांहीं लहान नाहीं. तिला सर्व समजूं लागलं आहे. बरं इला जर मी घराची मालकीण म्हणून आणली तर तिचा घरांत–चाकर माणसांत मान राहील हें ही मला पाहिलें पाहिजे ! पण या दोघींच्या झगड्यांत माझे मात्र हाल होतात ! दुसरं कांहीं नाहीं. एक घडीही निसुराईनें जात नाहीं ! जोंपर्यंत या दोघी एकमतानें वागणार नाहींत तोंपर्यंत माझा हा त्रास असाच रहाणार ! उलट दिवसेंदिवस वाढत जाणार ! आतां, त्याला एक उपाय आहे. तो हा कीं, सुशीलेसाठीं चांगला एखादा नवरा पाहून तिचं लग्न करून टाकावें. व ती एकदांची नवऱ्याच्या घरीं गेली म्हणजे सुटलों सर्व कटकटीं-तून ! पण तेथेंही मार्ग सरळ कोठें आहे ? नानासाहेबांस तिला द्यावी असं माझ्या मनांत फार आहे. परंतु त्या लफंग्या बाळासाहेबाकडे तिचा ओढा दिसतो व इच्या मनांत तर कांहीं निराळाच विचार दिसतो. सारांश–हें दुसरं लग्न करून सुखाचा जीव दुःखांत टाकला दुसरें कांहीं नाहीं !

( इतक्यांत आनंदीबाई व सुशीला भांडत येतात. )

**तात्या०**–काय हें आहे ? सुशीले काय ग हें ?

**सुशीला**–बाबा, आतां या घरांत माझी रहाण्याची शोभा नाहीं, मला द्या कोठेंतरी पाठवून !

**तात्या०**—असं काय वेड्यासारखी बोलत्येस ! कां ग, काय हा प्रकार आहे ?

**आनंदी०**–तिलाच विचारा. शहाणीना तुमची सुशीला ! ऐका कशी मुक्ताफळं पडताहेत तीं !

**तात्या०**–बरं ! बरं ! काय आहे तें तर कळूंद्या.

**आनंदी०**–असायचं तें काय ? माथ्यावर चढवून ठेविली ! वडील नाहीं, मर्यादा नाहीं ! वरचढ झाली ! तुम्ही पाहिजे तर माथ्यावर घेऊन नाचा तिला ! पण मला नाहीं चालायचं मी साफ सांगतें !

**तात्या०**–अग पण असं झालं तरी काय ?

**सुशीला**–बाबा, माझ्या आईच्या दागिन्यावर हक्क कोणाचा ? माझाच ना ?

**आनंदी०**–कशा कायद्याच्या गोष्टी करते ! कसचा हक्कबिक्क घेऊन बसली आहेस !

माझी पोरी असती तर कान उपटले असते ! पण माझं काय चालतंय इकडे ! असा माझा या पोरकुटलीच्या हातून पदोपदीं अपमान करण्यासाठीं मला आण-लीत वाटतं ?

**तात्या०**—अग पण अशानं मी समजावं तरी काय ? हें काय प्रकरण आहे ?

**सुशीला**—बाबा, माझ्या आईचे सगळे दागिने हळुहळू कांहींना कांहीं तरी निमित्तानें काढून घेतले ! आतां राहिली ती नथ. ती पण हवी आहे यानां ! पण मी कध्धींही देणार नाहीं बरं ! आई नेहमी ह्मणत असे कीं ती मला द्यावयाची ! शिवाय आईच्या दागिन्यांची मालकीण कोण ? मी—दुसऱ्या कोणाचाही त्यांच्यावर हक्क नाहीं !

**तात्या०**—हो खरं. पण—

**आनंदी०**—काय ह्मणालेत ? पुन्हा बोला पाहूं ! विसरलेत वाटतं लग्नापूर्वी काय काय ह्मणत असा तें ? आतां जिंकल्याचे सोहळे वाटतं ?

**तात्या०**—तसं नाहींग. पण ती काय ह्मणते तें ऐकलंस ना ?

**आनंदी०**—तुह्मी त्या पोरीचं काय ऐकतां ! एवढीशी पोर हक्काच्या गोष्टी सांगत्ये ! लहान तोंडीं मोठा घांस ! उद्धट पोर ! आईनें म्हणे अस्सं सांगितलं—तस्सं सांगि-तलं—तें सगळं गेलं तिचे बरोबर ! आतां मी घराची मालकीण! कां खरं कीं नाहीं ? गुपचिप् कां बसलेत ? बोला !

**सुशीला**—बाबा, बाबा, कसं हें सगळं निमूटपणें ऐकून घेतां तरी ? कशीही भुरळ घातली तुम्हांला ?

**आनंदी०**—असं का ? भुरळ घातलीका तुमच्या बाबानां मी ? भुरळ कां ह्मणतां ? मोहिनी घातली ह्मणा ! नाहींतर कांहीं करणी बिरणी तर नाहीं केलीना ? काय हा माझा अपमान ! व तोही तुमच्या समोर ! हें तुह्मांला पहावतं का ? ( रागानें ) दोन थोबाडांत लगावल्या पाहिजेत ! किती जिभली ही लांबली—

**तात्या०**—अग पण—

**आनंदी०**—अगपण—अगपण काय करीत बसलेत आहा ! पण नको, तुह्मी तिचे जेवढे व्हाल तेवढे माझे होणार आहातका ? नाहींच ! मी बोलून चालून परकी, ती पोटची. बरं तर घ्या हे सगळे दागिने. ती मालकीण ना? द्यातर तिला-( दागिनें काढूं लागते.)

**तात्या०**-हं. हं. असं काय हें करतेस ? अविचारी पोर आहे ती. तिच्या बोलण्याकडे तुझ्या सारखीनें लक्ष्य देणं बरं आहे का ?

**आनंदी०**-पोर कां ही ! इला आतां पोर का ह्मणायची ? मला नाहीं हें सहन व्हावयाचं ! एकदाचं मला कळूं द्या. या घरांत मालकीण कोण-मी कां ही ? या गोष्टीचा निकाल झाल्याशिवाय मी या घरांत अन्न नाहीं घ्यावयाची ! ( जाऊं लागते. )

**तात्या०**-अग पण थांब तर खरी. असं भलतंच काय ह्मणत्येस ! ही सर्व भानगड दागिन्यासाठींच ना ?

**आनंदी०**-आज एक दागिन्याबद्दल-पण एरवीं सगळ्याच गोष्टींत असं! ही आपला अंमल गाजविण्यास पहाणार! मी जसा काय केर कीं कचरा ! किती ह्मणून सांगू ! मेल्या नोकरचाकरासही फितवायचं ह्मणजे काय ?

**सुशीला**-निवळ खोटं हो बाबा. खरा प्रकार वेगळाच आहे. यांच्या सांगीवरून मेले नोकरचाकरही सांगितलं काम ऐकत नाहींत. येताहेत कोठें नोकर लोक माझ्या वाट्याला! सारावेळ यांच्याच कामाखालीं चूर असतात. उगाच कांहीं बोलतात झालं.

**आनंदी०**-झालं. मी लबाड, मी तुमच्या नोकरलोकांस फितविणारी. अहो, ऐकतांना ? ही तुमची भोळी बिचारी पोर ! बसा घेऊन तुमच्या लाडक्या पोरीला, मी जातें आपली माझ्या आईबापांच्या घरीं ! तेथें सुखानें तरी राहीन ! ( रागानें जाते. )

**तात्या०**—अग-अग-इकडे ये-फीर माघारी ! अग माझ्या करितां तरी ! छेः गेली— ( तिच्यामागें जातात. )

**सुशीला**—अरे ! अरे ! आतां बाईसाहेबांची समजूत करतां करतां बाबांचा जीव जेरीस येईल ! किती मनधरणी तरी करावी लागेल ! देवा ! देवा !

( नानासाहेब येतात. )

**नानासाहेब**—कोणाची मनधरणी ताई ?

**सुशीला**—अगबाई ! कोण, बाळासाहेब ?

**नाना०**—ध्यानीं-मनीं-सदा बाळासाहेब ! आम्हां सारख्यांची आठवण पण कधीं होत नसेल ! खरंच कीं नाहीं ताई ?

**सुशीला**—कां नाहीं आठवण होणार ! बाळासाहेब व तुम्ही मला वेगळे आहां काय ? दोघेही सारखेच !

**नाना०**-ताई अशा उडवा उडवीच्या बोलण्यानं मी फसेन असं तुला वाटतं का ? पण मी विचारतों. त्या उनाड पोरावर तूं व्यर्थ कां भाळली आहेस ? मी तुझ्या बऱ्यासाठीं सांगतों. असा कोणता त्याच्यांत तुला गुण सांपडला कीं—

**सुशीला**—हें पहा नानासाहेब. बाळासाहेबानां तुम्ही बापाठिकाणीं आहां. तेव्हां तुम्हीं त्यांची नालस्ती करावी हें मला तर पसंत नाहीं. आतां, माझ्या संबंधानें म्हणाल तर मला माझं बरं वाईट समजतं. तुमच्या उपदेशाची मला निदान हल्लीं गरज नाहीं. जरूर पडल्यास, मी तुमच्यापाशीं उपदेशासाठीं जेव्हां येईन तेव्हां वाटेल तेवढा उपदेश करा !

**नाना०**—मर्जी तुझी ! मी केवळ तुझ्या हितासाठीं सांगत होतों. बाळासाहेब–( बाळासाहेब येतात. )

**बाळासाहेब**—माझं कोण नांव घेत आहे ? ओहो ! कोण नानासाहेब ? आपली स्वारी कां इकडे आहे ? ताई–मला लायब्ररींतून आणण्यास सांगितलेलें पुस्तक हें मी आणलं आहे. चल येत असशील तर आपण त्याच्यांतला कांहीं भाग वाचूं.

**सुशीला**—चला–चला–अशानें तरी दुःखाचा विसर पडेल—( जातात. )

**नाना०**—बरं ! बरं ! सुशीले, याचं उट्टं काढीन बरं कधीं तरी ! बाळासाहेब, या ढोंगासोंगानें तिला पटकाऊन नेण्याची खटपट चालविली आहेस का ! ठीक, ठीक! पाहूं, कोण जिंकतो व कोण हरतो तें ! ( जातो. )

## अंक १ ला–प्रवेश ६ वा.

### स्थल–मठ.

[ बुवामहाराज व शिष्यमंडळ. ]. [ देवीची पूजा आरती वगैरे. ]

**बुवामहाराज**—जयअंबे ! जयअंबे ! शिष्यजनहो, व भक्तजनहो, अंबाबाईचा नामघोष करा. तिची प्रेमभावानें सेवा करा. या कलीयुगांत हाच तरणोपाय संतजनांनीं सांगितला आहे. नारायणा–

**नारायण**-गुरुमहाराज, काय आज्ञा आहे ?

**बुवा०**-या भक्तमंडळीस देवीचा प्रसाद वांटून द्यावा.

**नारा०**-जसी महाराजांची आज्ञा. [ नारायण प्रसाद वांटतो. ] महाराज, मंडळीवर अनुग्रह होईल का ?

**बुवा०**–ठीक! ठीक! येऊंदे एकामागें एक. जयअंबे! जयअंबे!

**नारा०**–[ एका बाईस पुढें करून ] महाराज या बाईचा एकुलताएक मुलगा आज सहामहिने झाले क्षय रोगानें पीडित असून अलीकडे अगदीं बिछाना धरून आहे. औषधोपाय सर्व कांहीं करून पाहिले. परंतु गुण मुळींच नाहीं. तेव्हां आपणाकडून कांहींतरी होईल या आशेनें आल्या आहेत. त्या ह्मणतात त्यांच्या शेजारीणबाईच्या मुलास आपण गुण केलात तशीच त्यांच्यावर कृपा व्हावी.

**बुवा०**–छेः छेः आह्मीं गुण अवगुण कोण करणार! सर्व प्रताप जगदंबेचा! परंतु निमित्तमात्र जरी आह्मीं तरी आमची सेवा कोणाही मानवी प्राण्यास उपयोगी पडली हें ऐकून मनास आल्हाद वाटतो! बाकी करती करविती आई जगदंबा! जयअंबे! जयअंबे!

**बाई**–पण महाराज बाहेरची कांहीं पीडाबीडा नसेल ना?

**बुवा०**–छेः छेः किती तरी आपले लोक वेडे हे! भूतपिशाच्च इत्यादिकांवर विश्वास ठेवून एकाद्या भुत्याबित्याच्या नादीं व्यर्थ लागतात. व ते लोकही भाविक व भोळे लोकांस नादीं लावून वाटेल तसे लुबाडतात. हल्लींच्या काळांत खरी उपयोगी पडते अशी एक देवसेवा! इतर सर्व थोतांडें होत! असो! नारायणा–बाईस म्हणावं एकवीस दिवस बाईनें स्वतां देवीची सेवा केली पाहिजे. दररोज तीर्थ अंगारा नेऊन मुलास द्यावा. पुढें देवीच्या नांवानें यथाशक्ति ब्रह्मभोजन घालावें.

**बाई**–पण महाराज माझा पोरगा मला मिळेलना? मी सांगाल ती सेवा करण्यास तयार आहे. सांगाल तें व्रत–उपोषणं–सर्व कांहीं करीन. पण त्याला एकदांचें जीवदान द्या. आंगमेहनत तर करीनच पण शिवाय जर कांहीं पैसा लागला तर तोही खर्चण्यास मागें पहाणार नाहीं. त्याच्या जिवापेक्षां पैसा का जास्त आहे!

**बुवा०**–नारायणा, बाईला ह्मणावं पैशाशीं आम्हांस कांहीं कर्तव्य नाहीं. तुम्हांला वाटेल तो खर्च करा. आम्हीं जगदंबेच्या आज्ञेप्रमाणें मार्ग मात्र दाखविणार! बरं दुसरं कोण आहे?

**नारा०**–महाराज या बाईचा जांवई यांच्या पोरीस नांदवीत नाहीं. लग्नाला सात वर्षें झाली. पोरीला खोडबिड कांहीं नाहीं. तेव्हां आपल्या हातून कांहीं होईल काय ह्मणून विचारतात.

**बुवा०**–कोणी सवत वगैरे आहे खरी?

**बाई**--होय, व तिच्याच शिखवणीनें माझ्या पोरीला ते नांदवीत नाहींत. पण महा-राजांना, सवत आहे हें कसं समजलं ?

**बुवा०**--हं. हं. जगदंबेची कृपा ! नारायणा, बाईला ह्मणावं मुलीकडून देवीचा पाठ अकरा दिवस वांचीव.

**बाई**--पण पोरीला लिहितां वांचतां मुळींच येत नाहीं.

**बुवा०**--कांहीं चिंता नाहीं. कोणा ब्राह्मणाकडून वाचविल्यासही चालेल.

**बाई०**--महाराज तुम्हीच तेवढं करवा. मी पैसे देईन. हे घ्या किती लागतील.

**बुवा०**--हं. हं. आह्मांस पैसा नको. नारायणा, कोणी चांगला कर्मनिष्ट ब्राह्मण पाहून त्याच्याकडून पाठ वाचीव. आणि हा अंगारा नवऱ्याचें घर ज्या दिशेस असेल त्यादिशेकडे फुंकून टाकावा. ( अंगारा देतात. )

**नारा०**--महाराज यांना आपणाशीं एकांतांत गोष्ट करणं आहे.

**बुवा०**--कांहीं चिंता नाहीं. या जवळ या. असे बसा येथें. इतर मंडळी जरा बाजूस होईल. ( इतर मंडळी बाजूस होते ) आपलं काय ह्मणणं आहे ?

**भक्त**--महाराज माझ्या जावयानें माझ्या पोरीच्या हयातींतच दुसरी बायको केली व तिला झाला आहे मुलगा. तेव्हांपासून इच्या पोटच्या पोराचे जे हाल होताहेत ते सांगतां पुरवत नाहीं. आणि त्या पोरकुटल्याचे लाड आणि पोंग पुसायलाच नको!

**बुवा०**--शेंकडा नव्याण्णव ठिकाणीं असंच व्हावयाचं ! त्याला इलाज काय ? मर्जी जगदंबेची व नशीव तुमच्या मुलीचें व तिच्या मुलाचें. बरं. पुढें तुमचं काय ह्मणणं आहे?

**भक्त**--हें पहा बुवामहाराज, काम फत्ते झाल्यास आपण सांगाल तें व मागाल तें मी देववीन!

**बुवा०**--अहो बक्षीसाची गोष्ट राहूंद्या. पण आम्हीं काय करायचं ?

**भक्त**--एवढंच कीं कसं तरी करून त्या पोराचा कांटा निघेल असं--

**बुवा०**--शिव! शिव! हर ! हर ! हें काय ह्मणतां ! आमच्या हातून त्या बिचाऱ्या निर-पराधी बालकाची हत्या घडवूं पहातां! हें पहा, पहिल्यानें या काळांत जारण मारण या मंत्राचा जोर अगदींच चालत नाहीं. तसं नसतं तर शत्रु उत्पन्न झाला कीं झा-लाच त्याचा निकाल, एका निंबानें व मुठभर उडीदांनें! व आणखी हें कीं मूठ मारणें इत्यादि कृत्यानें कोणासही दुसऱ्याचा जीव घेतां येत नाहीं. जगणें, मरणें, हें ज्याच्या त्याच्या प्राक्तनावर अवलंबून असतें. त्याच्यांत तिळमात्रही फरक कोणत्याही उपा-

यानें होऊं शकत नाहीं, समजलेत ! तेव्हां जा, भलता नाद टाकून द्या व तुमच्या मुलीच्या पोराबाळांचें तसेंच तिच्या सवतीच्या मुलाचें बरें इच्छित असा. त्यांतच कल्याण आहे. जगदंब करील तर तुमच्या नातवावरही बाप ममता करूं लागेल ! नारायणा, सेवेची वेळ झाली आणखी कोणी आहेका ? जगदंब ! जगदंब !

( कोणीं बरफी पेढयांचीं ताटें आणून ठेवतात. आनंदीबाई गजरी सह येतात. त्यांस पाहून )

नारायणा, ही बरफी पेढयांचीं व फळांचीं ताटें कोणीं आणलीं ?

**नारा०**-रिक्तहातीं सत्पुरुषाच्या भेटीस जाऊं नये ह्मणून या बाईसाहेबांनीं आपणांस भेट म्हणून आणलीं आहेत. शिवाय महाराजांस उपोषण आहे हें कांहीं भक्त मंडळीस समजल्यामुळें त्यांच्याकडूनही तें पलीकडचें फराळाचें सामान आलें आहे.

**बुवा०**-छत्! छत्! आह्मांसारख्यांस या जिनसांचा काय उपयोग ! आमच्या व्रतास असले पदार्थ वर्ज्य ! शिवाय आपले लोक उपोषणाचा खरा अर्थ काय समजतात? यथेच्छ फराळाचें स्वाहा करून उपोषण तें कसं पाळायचं ! अशा रीतीनें पाळलेलें उपोषण पाळलें काय न पाळलें काय सारखंच ! असो ! धर्मासंबंधीं अशा वेड्या समजुती आमच्या लोकांच्या डोक्यांतून जातील तो सुदीन ह्मणायचा ! असो ! नारायणा, बाईसाहेबांना बसायला आसन दे. [ आनंदीबाई बसतात. ]

**नारा०**-महाराज देवाच्या कृपेनें संपत्ति वगैरे सर्व कांहीं ठीक आहे पण संतति नाहीं.

**बुवा०**-ठीक ! ठीक ! जगदंबेच्या कृपेनें तीही प्राप्त होईल !

**नारा०**-महाराज सांगतील ती सेवा, धर्मनेम, खर्च वगैरे करण्यास बाईकडून तयारी आहे. आज्ञा व्हावी.

**बुवा०**-ठीक ! ठीक ! जगदंबेचा हुकूम घेऊन आपणांस त्वरित कळवितों. तोंपर्यंत हा अंगारा घेऊन जावा, व सकाळ संध्याकाळ इकडून तीर्थ घेऊन जावें ! तीर्थ अंगारा यजमानास पोंचला पाहिजे हो !

**आनंदी०**-अगबाई ! त्यांना यांतलं कांहीं कळलं नाहीं पाहिजे हो ! त्यांचा या गोष्टीवर मुळींच विश्वास नाहीं.

**बुवा०**-( हंसून ) असेही किती लोक असतील. पण कांहीं चिंता नाहीं. त्यालाही आमच्याजवळ इलाज आहे. संध्याकाळीं कोणास पाठवावें. मी विभूतीच्या पुड्या पाठवून देईन त्या बिछान्याखालीं उशाशीं ठेवाव्या ह्मणजे झालें. आपण मात्र तीर्थ घ्यावें.

**नारा०**–महाराज, बाईसाहेब विचारताहेत कीं कांहीं पैसे देऊं का. मी ह्मणत होतों आजच कांहीं पैशाची जरूर नाहीं. पण कदाचित् जप, अनुष्ठान वगैरे करणें झाल्यास पांच पंचवीस जवळ असलेले बरं ! लहान सहान रकमासाठीं वेळोवेळीं बाईसाहेबांना तसदी कशाला ! खरं कीं नाहीं !

**बुवा०**–तें तूं पहा. आपणाला पैशाशीं काय कर्तव्य ! खुशी असल्यास स्वतः करूंदे खर्च.

**आनंदी०**–छः छः असं काय ह्मणतां ! आपला विश्वास नाहीं कीं काय ! खर्चबिर्च सर्व आपल्याच हातून होऊं द्या. तुम्ही मात्र मला सांगा कीं अमुक रकम लागेल. मी तावडतोब पाठवून देतें, इच्याबरोबर.

**नारा०**–मी ह्मणत होतों, सांप्रत शंभर–नको–एवढे कशाला ! पन्नास पुरे होतील. मग पुढें पाहूं तुह्मी कांहीं दूर नाहीं.

**आनंदी०**–बरं तर. मी पाठवून देतें गजरीबरोबर. पण महाराजानां विचारावं, माझं काम होईलना ?

**बुवा०**–जगदंब समर्थ आहे ! आतां ही गोष्ट खरी आहे कीं असलीं कामें जरा कष्टसाध्य असतात. परंतु जगदंबेची सेवा करून व जपजाप्य इत्यादि साधनानें साध्य करूं. कांहीं काळजी करूं नये. परवांच्या गुरुवारीं जगदंबेच्या प्रसादास याल, तेव्हां या संबंधानें जास्त सांगेन.

**आनंदी०**–( उठून महाराजांस नमस्कार करून ) मी येतें आतां.

**नारा०**–महाराज, बाईसाहेबांस आज्ञा—

**बुवा०**–यावें, कल्याण ! कल्याण ! जगदंब इच्छित कामना पूर्ण करील !

( आनंदीबाई जातात. इतर मंडळी जाते. )

**बुवा०**–नारायणा, कितीतरी भाविक लोक हे ! या बकाली शहरांत कोणतेंही बंड माजवा, त्यांच्या नादीं लागण्यास लोक तयार आहेत. पण हें पहा ! हें सावज हातांतून जाऊं न दिलें पाहिजे हो ! बरंच भोळं दिसतंय. येथें आपली चांगलीच पोळी पिकेल ! बाईच्या मनावर येथल्या सर्व थाटमाटानें बराच परिणाम झालासें दिसलें व ज्या कार्यासाठीं ती आपल्याकडे आली आहे तें या बायकांच्या समजुतीप्रमाणें अति महत्वाचें आहे. व त्यासाठीं या बायका पाहिजे तें करतील, सांगाल तसें ऐकतील ! असो. इला बरीच लुबाडतां येईल. व तसं झालं तरच येथें आल्याचें चीज होईल. जगदंब समर्थ आहे ! जय अंबे ! ( पडदा पडतो. )

## अंक १ ला-प्रवेश ७ वा.

**स्थल**-( तात्यासाहेबांची खोली. )

( तात्यासाहेब वाचीत बसले आहेत.)

( घड्याळांत दोन वाजतात. )

**तात्या०**-ओहो ! दोन वाजले तरी यांचं ठिकाण नाहीं ! या नेहमी नेहमीच्या जागरणानें माझी तबियतहि बिघडली ! ही बाहेर चैन मारायला जागार व मी घरीं जागत वाट पहात बसणार ! काय हा जुल्म ! एकदां का या बायकांना नाटकें वगैरे पाहण्याची चट लागली ह्मणजे मग त्यांना पुढें आवरणें कठीण ! इला पहिल्या पासूनच आटोक्यांत ठेवणें जरूर होतें. खरं, पण ही काय सांगितलेलें ऐकते ! कोणतीही गोष्ट एकदां मनांत भरली पुरे-मग ब्रह्मदेवाच्यानेंही तिला माघारी फिरववत नाहीं ! अलिकडे पाहिलें तर घरांत तिचें चित्तच नाहीं ! नेहमीं कोठें-तरी बाहेर गेलेली असते ! ( शोधून ) अरे माझी तपकिरीची डबी कोठें गेली? ( इकडे तिकडे शोधून ) छः इकडे कोठें दिसत नाहीं. कोठें पडली तर नसेल ? ( पुन्हां शोधतांना उशाखालीं पहातात ) अरे हें रे काय ? ही पुडी कशाची ? काय ( पुडी उघडून ) हें विभूतीसारखं काय बरें असावें ? ( विचारांत पडतात ) असेल कोणा देवाचा अंगारा, प्रसाद. राहिला असेल विसरून. ( पुडी ठेवावयासाठीं बिछाना वर करितात तों पायथ्याशीं दुसरी पुडी सांपडते ). अरे, ही दुसरी पुडी ! ( उघडून ) तशीच ! हें काय बरें असावें ? पण गजरीनें हे बिछाने केले असतील. तेव्हां तिला विचारलं असतां सर्व कांहीं कळेल. पण ती आतां निजली असेल. उद्यां सकाळीं विचारूं-( विचारांत पडतात ) पण याचा काय बरें अर्थ असावा ? माझी बुद्धी मुळींच चालत नाहीं. त्या गजरीला कांहीं तरी माहीत असेल ! हांक मारून तर पाहूं या. गजरे, अग गजरे ?

**गजरी**-( अर्ध्या झोपेंत आंतून ). आं. कोन हांक मारतंय ?

**तात्या०**-गजरे, अग उठ जरा—

**गजरी**-( अर्ध्या झोपेंत असतां ) बाईसाहेब, लई एळ झाला !

**तात्या०**-अग ती नाहीं अद्यापि आली. पण मी तुला हांक मारली-अशासाठीं कीं, या पुड्या कशाच्या ग ? आणि त्या इकडे कोणी ठेविल्या ?

**गजरी**–( अर्ध्या झोंपेंतच ) अं-त्या पुड्या-बुवा--बाईसाहेब अं- ( डोळे चोळते. )

**तात्या०**–( रागानें ) काय ग ए, तुझी झोंप अद्याप पुरी झाली नाहीं वाटतं? नीट जबाब देतां येत नाहीं का? या पुड्या कशाच्या?

**गजरी०**–[ घाबरून चपापल्यासारखी होऊन ] काय पुसतां? पुड्या का? हां हां! त्या माझ्या तुह्मांला गवसल्या का? बिछाना करितांना राहिल्या चुकून. आमच्या गांवच्या देवाचा अंगारा.

**तात्या०**–वरं तर–जा नीज जा! केव्हां तुझी बाईसाहेब येणार कोणास ठाऊक!

[ गजरी जाते. ]

[ आनंदीबाई येतात. ]

**आनंदी०**–[ हंसत हंसत ] फार वेळ झाला नाहीं का? पण ठाऊक कोणाला इतका उशीर होईल ह्मणून, बाई, बाई! या गाडीवाल्यांना कितीतरी माज आला आहे! गाडी कांहीं केल्या मिळेना! शेवटीं मिळाली एक मोठ्या शर्थेनें. पण तुह्मी काय जागत बसलां आहांत माझ्यासाठीं?

**तात्या०**–मी कांहीं तरी तुला दोष देतों काय? तुझंच मन तुला खात असेल! नाहीं तर न मागतां खुलासा देण्याची जरूर नव्हती.

**आनंदी०**–खुलासा आणि तो कोणाला द्यायचा? व तो कां ह्मणून? मी काय गुलाम बिलाम आहें कीं काय? अं. मी आपलें सहजच ह्मणालें! एखादे दिवशीं नाटकास गेलें व जरा उशीर झाला त्यांत काय असें झालं? आणि तुह्मांला जागत रहायाची काय जरूरी होती?

**तात्या०**–खरंच, जागत राहिलों हा माझाच वांक!

**आनंदी०**–मग तुमचें ह्मणणें तरी काय आहे? उगीच माथं कां फिरवितां? निजा जा.

**तात्या०**–ह्मणजे मी या घरांत कोणीच नाहीं? तूं वाटेल तसें करावंस! तूं वाटेल तेथें जावेंस! मला कांहींच बोलण्याचा अधिकार नाहीं कीं काय?

**आनंदी०**–तुह्मांला अधिकार मिरवायचा होता तर करायची होतीत एक आठ दाहा वर्षांची चिटुकली पोर! पोट भरून मिळाला असता हक्क नी अधिकार मिरवायला!

**तात्या०**–बरोबरच आहे! विसरलीस ते दिवस. आईबापांचे घरीं काबाडकष्ट करतांनां कशी माकडासारखी दशा झाली होती, आणि आतांचें तेज पहा! आणि त्या-

वेळीं धड वस्त्र नव्हतें आंगावर–वस्त्र! आणि येथें काय नवीं नवीं पातळें-नी नवे नवे पोलके ! आणि येवढाही पैसा खर्च होऊन मला सुख काय ? हेंच कीं नाहीं ?

**आनंदी०**–तर तुमचे मनांत मला काय एकाद्या मजूरकरणीसारखी ठेवावयाची होती?

**तात्या०**–इतका काय मीं मूर्ख नाहीं. पण सगळ्याला सीमा आहे ! काय हा उधळा खर्च चालला आहे ! झेंपेल कसा ? निरर्थक खर्च करण्यांत शहाणपणा तो काय !

**आनंदी०**–मग पैसा असून काय कामाचा ! तुह्मीं पाहिजे तर रहा तिमाजी नाईकासारखे ! मला तसं राहणं नाहीं खपायचं ! या सर्व गोष्टींचा पूर्वींच विचार करायला पाहिजे होता. तुमच्या संपत्तीचे मालक तुम्हीं एकटेच आहांत असा तुमचा समज असेल तर तो निवळ भ्रम म्हणून दूर करा ! मीं अशा सुपें फडफडण्याला भीत नाहीं. जोंपर्यंत चोरी—चहाडी—व—

**तात्या०**-पुरे पुरे! पुष्कळ झालें !—

**आनंदी०**–कां? पुरे कां? या तीन गोष्टींची मला भीति. जोंपर्यंत मी त्या संबंधानें चोख आहे तोंपर्यंत मी तुम्हाला तर काय-तुमच्या देवाला नाहीं भ्यावयाची ! समजलेत? निजा आतां व माझ्या वाटेस उगाच जाऊं नका. मी हे दागिने व कपडे काढून येतें–गजरे—[ जाऊं लागते ].

**तात्या०**–अरे हो-बरी आठवण झाली. ( आनंदीबाई पुढें जातात ] अग–या–

**आनंदी०**–[ जातांजातां ]–मी आतां कांहीं ऐकायची नाही–अंहं–( जाते ).

**तात्या०**–( उसासा टाकून ) अरे–अरे–पुरं बोलूं पण देत नाहीं. पण असं हें चालणार तरी कसं? बरं, दोन शब्द कमी जास्त बोलावे तर तिला ऐकायला अवकाश तंरी कोठें आहे ? सदा नाटकें–नी हें नी तें–कांहीं ना कांहीं तरी आहेच! छेः छेः इचं डोकं फिरून गेलं आहे यांत संशय नाहीं! पण या सर्वांचें कारण पाहूं गेलें तर मीच! माझाच सगळा वांक! इच्या स्वभावाची पारख होण्यापूर्वींच इतकी ढिली दोरी सोडायची नव्हती! दाब नसल्यामुळें ही फारच शेफारून गेली आहे ? पण त्यांत काय झालें ? त्याचा कांहीं तरी चांगला बंदोबस्त केला पाहिजे ! व तोही जितका लवकर तितका बरा! आतां निजावं–येतील बाईसाहेब सावकाश ! [ जातात ].

## अंक पहिला समाप्त.

# 'ढोंगी दुनिया'
## अर्थात्
# 'जें सारें चकाकतें तें सोनें नव्हे.'

( मागील अंकावरून पुढें चालू. )

## अंक २ रा.—प्रवेश १ ला.

### स्थळ—पेढी.

काकासाहेब व विसाजीपंत.

**काकासाहेब**–काय ह्मणतां? आमच्या तात्यासाहेबांनीं दुसरा संबंध केला तर? त्यांच्या मनांत काय हें वेड भरलें ? त्यांच्यासारख्या शहाण्याच्या हातून असं व्हावं याचं मला मोठं नवल वाटतं!

**विसाजीपंत**–त्यांत नवल कशाचं, काकासाहेब? घरांत संसार पहाण्यास कोणी माणूस हवं होतं ना? त्यांचं आतां उतार वय झालं, कोणी तरी कळकळीचें माणूस बरदास्त ठेवण्यास पाहिजे होतें ना? सुशीला आतां किती दिवस अशीच रहाणार! आज नाहीं उद्यां तिचं लग्न होऊन ती आपल्या घरीं जाणारच. तसं झालं ह्मणजे मग घरांत कोण?

**काका०**–अंः त्यापेक्षां तिचंच लग्न करून जांवयास घरांत आणून ठेऊन द्यायचं होतं. बाकी, एक पैसा असला ह्मणजे या जगांत सारं काम होतं!

**विसाजी०**–काकासाहेब! पैशानें माणसं मिळतील खरीं. पण खरी कळकळ व माया ही त्यांच्यांत सांपडेल काय? मुलगी झाली तरी काय? तिची माया आपल्या मुलाबाळांत गुंतलेली रहावयाची. पण बायको ह्मटली ह्मणजे तिची गोष्ट वेगळी. किती हीं झाली तरी ती बायकोच!

**काका०**–छट्! मला हें तुमचं ह्मणणं बिलकूल कबूल नाहीं. शिवाय ह्मातारपणच्या बायकोची माया किं ममता कशाची घेऊन बसलांत हो! उलट पश्चात्तापाला कारण! बरं पण या बाईसाहेब तरी कशा आहेत?

**विसाजी०**-काकासाहेब, या घरगुती गोष्टी नाजुक असतात. तेव्हां निवळ बाहेरच्या गपाड्यावर विश्वास ठेवण्यांत हांशील नाहीं.

**काका०**-हं ! एवढ्यांतच लोकवार्ता निघूं लागल्या तर !

**विसाजी०**-त्यानां काय वाण आहे ? लोकांना दुसरा उद्योग काय ?

**काका०**-हे उद्योगी लोक ह्मणतात तरी काय ?

**विसाजी०**-अं:, तसं विशेष कांहीं नाहीं, पण ह्मणे आई लेकींचं पटत नाहीं, दररोज कांहींना कांहीं तरी तंटा बखेडा आहेच! हो पण बरी आठवण झाली. या गोष्टीमुळें मुख्य तें मागें राहिलें. काकासाहेब, आपण आलां आहांत हें नानासाहेबांस किंवा बाळासाहेबांस कळलं नसेलच ?

**काका०**—बिलकुल नाहीं ! व मी मुद्दाम त्यांना कळविलं पण नाहीं. विसाजीपंत, तुमच्या व इतर लोकांच्या पत्रांवरून त्यांत कांहीं तरी गोम आहे असा माझा समज झाला आहे .

**विसाजी०**—काकासाहेब, बेअदबी माफ असेल तर दोन शब्द बोलतों. हें पहा, या दोघांस मी लहानपणापासून ओळखतों. व त्यांचं वर्तन मी आजपर्यंत पहात आलों आहे. तेव्हां बाळासाहेबांविषयीं कोणी कांहींही म्हणो. मी ह्मणतों, आहेत ज्वानीचे दिवस, त्यांत आपणासारखे श्रीमंत काका देताहेत पैसे, चार दिवस मारतील चैन-करतील मौज; पुढें मग जबाबदारी माथीं पडली-कीं तेच चालवतील कारभार. लग्न वगैरे लागून एकदां संसारांत पडले कीं मग त्या गांवचे ही नाहींत असं वाटेल.

**काका०**—छट् ! हें काय असं ह्मणता ? त्याला पण सीमा आहे. पण मी ऐकतों तसं असल्यास—ह्मणजे उनाड मित्र मंडळी-नाटकें-नाच तमाशे-बाहेरख्याली जुगार-सावकाराचें देणें-कोर्टांत हसे—

**विसाजी०**--छी:, छी:, हें आपणास कोणी उगाच आपलं मन त्यांच्या संबंधानें बिघडावें ह्मणून द्वेषानें सांगितलं असावंसं दिसतें. छट्, तसा कांहीं प्रकार नाहीं.

**काका०**--तुह्मीं ह्मणतां तसं असलं तर फारच चांगलं-परंतु या बातम्यांत खरे खोटेपणा किती आहे, व माझ्यावर या दोघां पैकीं कोणाचं खरं प्रेम आहे हें प्रत्यक्ष शोधून काढण्यासाठीं मी ही युक्ति योजिली आहे. मी येथें आलों आहे हें त्यांना

माहीत नाहीं, व त्यांनीं मला बरींच वर्षे पाहिलें नाहीं, तेव्हां त्यांना माझी तोंडओळख असेलसं वाटत नाहीं. तर त्यांची मी एक दोन रीतीनें प्रत्यक्ष परीक्षा घेणार, मग पहातों कोण कसोटीस उतरतो तें! पण विसाजीपंत–ही गोष्ट तुह्मांला कीं मला माहीत. तिसऱ्या कानाला समजली नाहीं पाहिजे हो—

**विसाजी०**–माझ्या संबंधानें मला सांगायाला नको! पण तात्यासाहेबाविषयीं कसं काय? त्यांच्याकडून देखील ही गोष्ट लपवून ठेवायची कीं काय?

**काका०**–छे, छे, त्या माझ्या प्रिय मित्राला केव्हां पाहीन व केव्हां त्याला कडकडून भेटेन असं मला झालं आहे! त्यांनाही आपल्या मसलतींत घेतलं पाहिजे. (हंसून) हं! हं! कोठें माझ्या मित्राला पुन्हां बिडी घालून घेण्याची हौस आली! हं! हं!

**विसाजी०**–तेच हे येताहेत वाटतं. हो, तेच. (तात्यासाहेब येतात)

**काका०**–या तात्यासाहेब या.

**तात्या०**--(न्याहाळून पाहून) कोण, काकासाहेब! वाः! अहो केव्हां आलांत? येथेंच पेढविर स्वस्थ बसून गप्पा मारीत बसलां आहां? वाः! सामानसुमान कुठें ठेवलंत? असं हें परक्यासारखं का?

**काका०**--बसा तर खरे अंमळ. तात्यासाहेब, तुमच्या सर्व प्रश्नाचा मग उलगडा करतों. पण पहिल्यानें हें कळूं द्या, आपण खुशाल आहां ना? अगदीं चैनींत?

**तात्या०**—चैनच आहे ह्मणावयाची! पण काकासाहेब आपणाला मात्र बाहेरगांवचें हवा पाणी चांगलं मानलं. तबीयत वगैरे गेलेत त्या पेक्षां सुधरलेली दिसते.

**काका०**–हं! हं! असेल, असेल. परंतु तात्यासाहेब तुह्मी मात्र थोडे त्रासल्यासारखे दिसतां? पूर्वीचं तेज वगैरे कुठं सगळं गेलं? असो! तात्यासाहेब आज पंधरा वर्षांत येथें बरेच फेरफार झाले असतील नाहीं बरं? जुन्याचं नवं–व नव्याचं जुनं–हं? तात्यासाहेब जुन्याचं नवं–खरं कीं नाहीं? हं! हं! तात्यासाहेब, हे काय ह्मणतात; आपण पुन्हां पायांत बिडी ठोकून घेतलीत. ठीक! ठीक! त्यांत काय वावगं झालं! प्रेमपाशच ते! त्यांनीं कोणाला सोडलं आहे? वृद्ध काय नी तरुण काय? व काळमहिमा तरी तसाच आहे. असो झालं तें ठीक झालं. आतां पुढल्या विषयीं ह्मणाल तर ते बहुतांशीं आपल्या हातांत आहे. ह्मातारपणीं लग्न करून पुष्कळ वर्षें संसार-

सुख आनंदानें भोगल्याचीं पुष्कळ उदाहरणं आपल्या पाहाण्यातलीं आहेत. दोनही कुळं समंजस असलीं तर मग सुखाला काय वाण! ठीक, तर. तात्यासाहेब, आपण मांडलेला नवीन संसार आपणाला सर्व प्रकारें सुखावह होवो अशी माझी पूर्ण इच्छा आहे. परमेश्वर ती पूर्ण करो!

**तात्या०**–काकासाहेब, एक तर आज किती वर्षांनीं आपली भेट झाली म्हणून मला आनंद झाला आहे. त्यांत या समयीं आपल्यासारखा मित्र मजजवळ आहे या विचारानें त्याच्यांत बरीच भर घातली आहे. काकासाहेब, वेडेपणा केला तर खरा. हें बघा, मला आतां वाटतं या भानगडीत पडलों नसतों तर बरं झालं असतं. उगीच या भानगडींत पडलों.

**काका०**–अरे, अरे, हें मी काय ऐकतों? हें ऐकून मला फारच वाईट वाटतं. तात्यासाहेब, विशेष कांहीं नाहींना?

**तात्या०**–काकासाहेब! आपण बालपणचे मित्र–विसाजीपंतही आपल्या कुटुंबांतील माणसासारखे, तेव्हां तुमच्या समोर काय लपवून ठेवायचं? मी होतों तो सुखी होतों. खरोखर सुखी होतों!

**काका०**–पण या अशा बोलण्यानें समजावं तरी काय? काय असेल तें मोकळ्या मनानें सांगा. उपाय होण्यासारखा असल्यास पाहूं.

**तात्या०**–काकासाहेब, काय सांगूं? तिचा स्वभाव भारीच तिखट. तिचं नी त्या सुशीलेचं क्षणभरही पटत नाहीं! त्यांची समजूत घालतां घालतां जीव बेजार होऊन जातो.

**काका०**–( मनांत ) छे, एवढ्याच कारणावरून आमच्या मित्रास इतका वैताग येणं संभवत नाहीं. याहून कांहीं जास्त असावं! बाईसाहेब तरूण, हे उतारवयाचे, तेव्हां यांच्या मनांत संशयरूपी पिशाच्च तर शिरलं नाहींना? तें नाचवील वेड्यासारखं! समजेल हळू, हळू, ( उघड ) अं–एवढंचना! मग त्यांत काय झालं? इतकं उदास कशाला व्हावयाला हवं? नवीन नवीन होईल तस, कांहीं दिवसांनीं, त्यांचेंच जिवश्च कंठश्च होईल, समजलेत?

**तात्या०**—बरं पण मी वेड्यासारखा माझ्या दुःखाची कहाणी सांगतच काय

बसलों ? व आज इतक्या वर्षांनीं माझा परममित्र आला त्याचं आगतस्वागत करायचं तें राहिलं एकीकडे. वाहवा ! कितीतरी हा आपमतलबीपणा !

**काका०**--छेः त्यांत आपमतलब तो कशाचा. आपण जर मित्र म्हणवितों तर हितगुजाच्या गोष्टी एकमेकांना सांगितल्याशिवाय रहावणार कसं. पहिल्या भेटीलाच तें भडभडून यायचं ! बरं पण तात्यासाहेब, या आमच्या बाळासाहेबांनीं म्हणे चारही शिडें हंकारलीं आहेत–

**तात्या०**—काकासाहेब, आमची कर्मकथा थोडी झाली का ? कीं त्यांत तुमची आणखी भरीस पाहिजे ? बाळासाहेबांविषयी पुष्कळ सांगणं आहे. पण तें राहील पुढल्या वेळेपर्यंत. आतां उठा—वाडयांत यायचंना ?

**काका०**—हें पहा, तात्यासाहेब, हल्लीं येथें आहें तो ठीक आहे. व तसं करण्यास कारणही तसंच आहे. चार दिवस विसाजीपंत ठेवतील बंदोबस्त पेढीवर--

**तात्या०**—तें मी कांहीं ऐकायचा नाहीं. चला पाहूं. पेटी–पाकेट कुठें आहेत ? चला-उठा कसे ! प्रवासांत बराच त्रास झाला असेल ! घरीं जेवणाखाणाची सर्व तयारी आहे.

**काका०**—तात्यासाहेब, मला तुमच्या इथं येण्याला आग्रह का पाहिजे ? मी तर हक्कानें येणार ! व मी जो इथं आलों तो कोणाच्या जोरावर ?

**तात्या०**—असं खरं ना ? मग अनमान कां ? हं, हं, आलं ध्यानांत ! घरांतील भांडणतंट्यामुळें संकोच वाटत असेल ?

**काका०**—छेः, छेः, अहो अशा तंट्याभांडणाला का भ्यावयाचं ! अशीं भांडणं नाहीं कुठं होत ? अहो भांड्याला भांडं लागायचंच आणि तसं म्हणाल तर अशा या तुमच्या स्थितींत मी अनायासें हजर असतां तुमच्या जवळ राहून तुमचा त्रास हलका होईल असे उपाय योजावयाचा—परंतु निरुपायास्तव कांहीं दिवस मला तुमच्या इथं रहातां येत नाहीं !

**तात्या०**-मला हें तुमचं गौडबंगाल कांहीं समजत नाहीं. असंही ह्मणतां–तसंही ह्मणतां—

**विसाजी०**-काकासाहेब, आपणांस यांच्याकडून ती गोष्ट लपवून ठेवणं नाहीं. मग सांगाचना एकदां त्यांना. तुह्मी कशाला, मीच सांगतों. हें बघा तात्यासाहेब

काकासाहेबांना त्यांच्या पुतण्याची परीक्षा घेणें आहे. ह्मणून त्यांना कळूं न देतां ते येथेंच पेढीवर कांहीं दिवस राहून त्यांच्या परीक्षेंत दोघांपैकीं कोण कसोटीस उतरतो हें पहाणार—

**काका०**–झालं–आता तरी समजलं ? एवढं झालं ह्मणजे मग आपलं घर आहेच.

**तात्या०**–अस्सं–अस्सं. बर तर मीं येतों आतां. पण विसाजीपंत काकासाहेब इथें आहेत तोंपर्यंत त्यांना कोणतेंही न्यून पडूं देऊं नका बरं ! जें कांहीं पाहिजे तें वाड्यांतून मागवा.

( जातात. )

---

## अंक २ रा– प्रवेश २ रा.

### स्थल–तात्यासाहेबांचा वाडा.

( सुशीला व नानासाहेब ).

**नानासाहेब**–सुशीले ! जरा ऐकून घेशील तर खरी ! मग तुला वाटेल तसें करण्यास तूं मुखत्यार आहेस.

**सुशीला**—पण नानासाहेब, हा कां बरं माझ्यापाठीं तुमचा त्रास ! मला स्वस्थ राहूं द्यावयाची नाहीं असा तुमचा निश्चय झालेला दिसतो !

**नाना०**—अग पण माझ्यापासून असा काय तुला त्रास होतो आहे ?

**सु०**–त्रास नाहीं तर काय ? मला जी गोष्ट रुचत नाहीं तीच नि तीच गोष्ट वारंवार माझ्याजवळ काढून माझी पाठ पुरवायची याला त्रास देणें म्हणावयाचें नाहीं तर काय ?

**नाना०**—पण ती गोष्ट तुला कां रुचूं नये ?

**सु०**—हें काय तुमचं विचारणें ! माझ्या मनाची मालकीण मी कीं दुसरी कोण ?

**नाना०**–पण तुझें मन माझ्याविरुद्ध इतकं कां ? माझी इतकी निर्भत्सना कां करतेस ?

**सु०**–हें तुमचं ह्मणणं अगदीं खोटं आहे. मी तुमच्या विरुद्धही नाहीं व तुमची निर्भत्सना करण्याइतकी आजच उन्मत्त झालें नाहीं.

**नाना०**–निर्भत्सना नाहीं तर काय ? आज किती दिवस झाले तुझ्या पाठीं लागलों

आहे. काकळूतही करून पाहिली पण सर्व व्यर्थ. दगडासही पाझर फुटेल पण तुझ्या या कठोर हृदयास दयेचा लवलेशही नाहीं! अशा या तुझ्या स्वभावास काय ह्मणावें?

**सु०**–पुन्हा तीच नी तीच गोष्ट. मी तुह्मांस कितीदां तरी सांगितलं कीं त्या गोष्टीचा नाद सोडा, अगदीं सोडून द्या. त्या खेरीज मी पाहिजे तें ऐकण्यास तयार आहे.

**नाना०**–मला जें पाहिजे तें नाहीं, मग दुसऱ्या गोष्टींत काय आहे. सुशीले, बघ अजून विचार कर, नको इतकी निष्ठुर होऊं. एकदम तोडूं नको. आशा बाळगण्यास मग थोडें कां असेना थोडें तरी कारण दे! मी तेवढ्यांतच संतुष्ट राहीन! मला तेवढं पुरेल!

**सु०**–शर्थ झाली बाई तुमची! हें बघा–मला कपटानें वागण्याचा अति तिटकारा आहे. उगीच खोटी आशा दाखवून मग कोणाचं मन दुखविणं–हें मला बिलकुल पसंत नाहीं! कडू कां लागेना–पण आधींच खरं सांगून दिलेलं बरं! झालं! यापेक्षां आणखी स्पष्ट तें किती सांगायचं माणसानं?

**नाना०**–असं, असं, समजलों. सुशीले, इतके दिवस मला नुसतं वाटत होतं. आतां तुझ्या या बोलण्यावरून माझी खातरी झाली. तूं त्या गोडबोल्या–लफंग्या–बाळासाहेबावर भाळली आहेस! बोल–खरं कीं नाहीं?

**सु०**–नानासाहेब, या तुमच्या प्रश्नास जवाब देण्यास मी बांधलेली नाहीं. मी पुन्हां तुह्मांस सांगतें कीं माझ्या मनाची मी मालकीण आहे.

**नाना०**–बरं–बरं–इतकी त्या भामट्यावर तूं भाळली आहेस खरी, पण संभाळ, पस्तावशील बरं.

**सु०**–अशा रीतीनें तुह्माला बोलायचं असेल तर मी येथून निघून जातें. नानासाहेब, या रीतीनें माझ्याशीं बोलण्यास तुम्हांला काय अधिकार?

**नाना०**–सुशीले, तूं वेडी आहेस. येथें अधिकार वगैरे कशाचा घेऊन बसली आहेस? तात्यासाहेबांनीं जितक्या हक्कानें तुला ह्मटलें असतें तितक्याच हक्कानें मी ह्मणतों.

**सु०**–बरं, बरं, असं खरं नां? ठीक तर, त्यांच्याच ठिकाणीं तुह्मीं आपणांस समजून मला काय बोलायचं असेल तें बोला–झालं? आतां तर तुमची कांहीं तकरार नाहीं? व मीही तें मोठ्या खुषीनें ऐकेन.

**नाना०**–छ, तें काय माझ्या कामाचं? सुशीले! तुझं मन मजविषयीं विनाकारण

कोणी दूषित केलं आहे यांत संशय नाहीं. व हा उद्योग कोणाचा हेंही मी समजतों. आपला हेतु पार पाडण्यासाठीं त्यानेंच माझ्याविषयीं तुझं मन दूषित केलें आहे. पण सुशीले, नकोग इतकी निष्ठुर होऊं! पहा! विचार कर! तुझ्या गळ्याची शपथ मला–( गळ्यास हात लावण्यास जातो. )

( इतक्यांत आनंदीबाई येते. )

**आनंदीबाई**–( रागानें ) काय हें नानासाहेब चाललं आहे? सुशीलाबाई! डौल तर मोठा आहे सभ्यपणाचा! आणि करणी कशी? ठीक! ठीक! त्यांना ह्मणावं बघा, बघा–तुमच्या शहाण्या सुत्या–सुशीलाबाईसाहेबांचे गुण! कसे पाजळताहेत ते!

**सु०**–मला बोलण्याची जरूर नव्हती. तुम्ही उगाच पिसाचा कावळा करून भलताच बोभाट कराल ह्मणून मला सागणें भाग आहे. तुम्ही जें पाहिलेंत त्यांत माझं बिलकूल अंग नव्हतें. याउपर तुम्हीं खरं माना किंवा नका मानूं! पाहिजे असल्यास नानासाहेबांसच विचारा!—( जाते ).

**आनंदी०**–कां–नानासाहेब! गीतेच्या कोणच्या श्लोकाचा अर्थ अगदीं इतक्या उत्कंठेनें समजावीत होतेत? नानासाहेब! असे धंदे केव्हांपासून करायला लागलेत? भाऊ बहिणीच्या नात्यासच अनुसरून मघां बाघितलेला प्रकार चालला होता वाटतं? कां–( नानासाहेब कांहीं ह्मणणार तों ) एक लबाडी छपविण्यासाठीं उगीच दुसरी लबाडी करूं नका! या खेपेस मी गुपचीप बसतें–पण असा प्रकार पुन्हां झालेला चालणार नाहीं बरं. समजलेत! ( जाते. )

**नाना०**–छट्:, हें चांगलं झालं नाहीं! बाईसाहेबांच्या मनांत सुशीलेशीं माझा संबंध जुळूं नये असं फार आहे. हा आग्रह कां, याचं मात्र कारण बिलकूल समजत नाहीं. असो! सध्यां तिच्या इच्छेप्रमाणें वर्तन ठेवण्यांतच फायदा आहे. तसं न केल्यास तिच्या विषयींचा माझा बेत सिद्धीस कसा जाणार? एकदां हें साधलें ह्मणजे मग सुशीला आहेच! ती कोठें जाते? सारांश, दोनहीकडून काम फत्तेह होणार असा रंग तर दिसतो खरा! मग परमेश्वराची इच्छा! प्रभो! तूं समर्थ आहेस!

( जातो. )

---

३३९८

# 'ढोंगी दुनिया'

अर्थात्

# 'जें सारें चकाकतें तें सोनें नव्हे.'

( मागील अंकावरून पुढें चालू. )

## अंक २ रा.-प्रवेश ३ रा.

### स्थळ-पेढी.

( वेषधारी काकासाहेब पूरणमल मारवाड्याच्या वेषानें व विसाजीपंत )

**वेषधारी काकासाहेब**-विसाजीपंत, मी अगदीं हुबेहुब मारवाडी दिसतो ना? अहो, ही पागडी कोणाची आणलीत? घामानें व ढेंकणानें भरलेली तर नाहींना? वा! हा आंगरखा कसा छान दिसतो पहा! अगदीं मारवाडी तऱ्हेचा. अरे-पण हे बूट कसे चालतील? मारवाडी लोक बूट घालतात का विसाजीपंत?

**विसाजीपंत**-अंः त्यांत काय? उमरावतीकडील सुधारलेले मारवाडी सावकार ह्मणून बाळासाहेबांना सांगू ह्मणजे झालं. तेथील श्रीमान् मारवाडी सुधारलेला पोषाख करितात हें आपणांस माहीत नाहीं काय?

**वे० काका०**-ठीक! ठीक! आतां कोणत्या भाषेंत बोलायचं? आपल्याला मराठी शिवाय दुसरी भाषा बिलकुल येत नाहीं!

**वि०**-त्याबद्दलही काळजी नको काकासाहेब! उमरावती, खानदेश, येथील मारवाडी मराठी छान बोलतात. तेव्हां मराठी बोलायला हरकत नाहीं.

**वे० काका०**-शाबास! विसाजीपंत, युक्तीवर युक्ती योजण्यांत तुमचा हातखंडा खरा! असो. पण पुढें काय करायचं?

**वि०**-पुढं का? आपण ठरविल्याप्रमाणें मी बाळासाहेबांकडे जाऊन आपला एक अति अडचणींत आलेला परंतु एक कुलीन घराण्यांतील मित्र आपणाकडे मदतीकरितां आला आहे, अशी गोष्ट काढली. बाळासाहेबांनीं म्हटलं मजजवळ विष खायाला पै देखील नाहीं, परंतु तुह्मी कोणी सावकार घेऊन याल तर त्याजपासून पैसे काढून काका-

साहेबांच्या मित्रास मदत करितों ह्मणून सांगितलें. त्याप्रमाणें आपणांस सावकार ह्मणून त्यांजकडे घेऊन जातों

**वे० काका०**–ठीक ! पण मी कधींही सावकारी केली नाहीं तेव्हां व्याज किती मागूं? सहा टक्के ?

**विसा०**–अरे ! अरे ! अशानें तर बाळासाहेबांसारख्या धूर्त मनुष्यास तुमचं ढोंग ताबडतोब समजून येईल. मारवाडी सहा टक्के व्याज मागणार ! मग झालें. पन्नास साठ टक्के नाहीं तरी चोवीस टक्के तर खरेंच ! शिवाय, पुष्कळ आढेवेढे घेऊन तारणा शिवाय देत नाहीं असं निकराचं सांगणं झाल्याखेरीज मारवाड्याच्या सोंगाची बतवाणी होणार कशी ? बाळासाहेब कसेही असले तरी ते मूर्ख नाहींत ते केंव्हांच उमगून काढतील ! चला तर—

(जातात.)

---

## अंक २ रा.–प्रवेश ४ था.

### स्थळ–वाडा.

(बाळासाहेब कांहीं मित्रासह चैनींत बसले असतां–)

(काकासाहेब पूरणमलच्या वेषानें व विसाजीपंत एका बाजूनें येतात.)

**वे० काका०**–(बाळासाहेब व त्यांच्या मित्र मंडळीचें वर्तन पाहून) वा ! विसाजीपंत, मुहूर्त नामी झाला ह्मणायाचा ! प्रथमग्रासे मक्षिकापातः.

**विसाजी०**–हं हं, हळू बोला ! नाहीं तर सर्व बिनसेल. काकासाहेब, हा चाललेला प्रकार अयोग्य आहे खरा. तरी फक्त त्याजवरूनच विशेष सिद्ध होतें असं नाहीं. तरुणवय आहे, उमेदीचे दिवस आहेत, मित्र मंडळी आहे, यांचा स्वभाव चारचौघांस खावविण्याचा आहे. शिवाय यांच्यावर कोणा वडिलांची नजर नाहीं त्यामुळें असं चाललं आहे. पण जरा पोक्तपणा आला कीं सर्व ठिकाणावर येईल. हाडीं चोख असल्यास या वरवरच्या ढंगानें काय होताहे ? काकासाहेब तुह्मी अम्मळ इकडेबसा. मी बाळासाहेबांस आपण आल्याची वर्दी देतों. (विसाजीपंत आंत जातात).

**१ मित्र**–बाळासाहेब ! हे आपले विसूनाना आले.

**बाळा०**–कोण ? विसाजीपंत ? अरे ! अरे ! तुह्मी इकडे कोठें ? दूर व्हा. ! दूर व्हा ! उगाच विटाळ होईल.

**मित्र**–या पंत–या–बाळासाहेब, पंतांना जरा दीक्षा देऊं या.

**बाळा०**—छद्द, भलतंच नाहीं तर ! त्यांना अशी मस्करी खपायची नाहीं. कां विसाजीपंत एवढ्या रात्रीं येथें कोठें ?

**विसाजी०**—साहेब, आपण सांगिल्याप्रमाणें सावकारास घेऊन आलों आहे. त्याला बाहेर बसविलें आहे. ( मित्रमंडळी थट्टामस्करी करूं लागतात. )

**बाळा०**—विसाजीपंत, त्यांच्याकडे तुह्मीं लक्ष देऊं नका. चला, तुमचा सावकार कोठें आहे तो पाहूं. ( बाहेर येतात. )

**विसाजी०**—बाळासाहेब, हे उमरावतीच्या उमाजी गमनाजींच्या पेढीचे मुनीम, पूरनमलजी. पूरनमलजी, हे आमचे बाळासाहेब. ( पूरनमलजी उठून बाळासाहेबांस लवून मुजरा करितात. )

**बाळा०**—असं काय ? ठीक. बसा. ( दोघे बसतात. )

**विसाजी०**—हे आमचे शेठ–यांना—

**बाळा०**—विसाजीपंत, थोडक्यांत आटपून टाका. उगीच पाल्हाळ करण्यांत अर्थ नाहीं. व मला फुरसूतही नाहीं. तिकडे मित्रमंडळीचा खोळंबा झाला असेल. हें पहा, मी आपणांस थोडक्यांत सांगतों. मी एक उडाऊ, चैनी, जहागीरदाराचा मुलगा आहे. माझा हात नेहमी ओढीस असतो. नेहमी मला पैशाची ताण असते. आमचे एक काका आहेत. ते नेहमी बाहेरगांवीं राजे रजवाड्यांतून फिरत असतात. त्यांचाही मी वारस आहें. त्यांच्याकडून आह्मांस महिन्यास खर्चासाठीं ठरीव रकम मिळते. पण ती माझ्या सारख्यास कितीसी पुरी पडणार ? हं हं ह्मणतां चटणीसारखी उडून जाते ! व आह्मी नेहमी रिकामे ते रिकामे. 'बाबूके भाई दरवेशी !' ही माझी गोष्ट झाली. आतां तुह्मीं कोण आहां तेंही मी सांगतों ! तुह्मी जेवढं व्याज काढवेल तेवढं काढून एकाचे दोन लिहून घेऊन माझ्यासारख्या गरजू, अविचारी–दिवाळखोरास त्याच्या चैनबाजीसाठीं पैसा पुरविणारे सावकार आहां.

**विसाजी०**–हं–हं–बाळासाहेब ! हे तशांतले नव्हत बरं ! यांचा व्यवहार अगदीं चोख आहे. तुह्मी ह्मणतां तशांतले हे बिलकूल नाहींत. फार कशाला ? हें पहिल्यानें

अशा व्यवहारांत पडण्यास खुशीच नव्हते. परंतु आपल्या पेढीशीं त्यांच्या पेढीचा आज पांचपन्नास वर्षें संबंध असल्यामुळें त्यांच्यानें माझी भीड मोडवेना.

**बाळा०**—तें मी कांहीं समजत नाहीं ? पण मी ह्मटलं त्यांत एक शब्द खोटा असेल तर माझा कान पकडा. मला मनांत एक व बाहेर एक असं बिलकुल पसंत नाहीं. पण त्याचप्रमाणें मला हें पण सांगणं जरूर वाटतं कीं आह्मी आमच्या काकासाहेबांचे एकटे एक वारस आहोंत. व त्यांच्यामागें त्यांची सारी इस्टेट आह्मांसच मिळायची ! ही एक मोठी गोष्ट आमच्या तर्फेची आहे खरी.

**वे० काका०**—तें मला सर्व कळून चुकलं आहे–रावसाहेब.

**बाळा०**—झालं तर मग, आणखी काय पाहिजे ? मग आपण किती पैसे देण्यास तयार आहां ? पण हें पहा, तारण वगैरे मागाल तर फुटकी कवडी ही नाहीं बरं ! दोन हात, दोन पाय व पुढें वारशा मिळणार ही आशा, तोंपर्यंत ह्मणजे काकासाहेबांच्या ह्यातीपर्यंतच्या मुदतीची चिठ्ठी.–कां ? नाक कां मुरडतां ?

**वे० काका०**—हें पहा, रावसाहेब, असा कुठं व्यवहार होतो का ? आमच्या पैशास कांहीं तरी तारण पाहिजेच ! पुन्हां आपण ह्मणतां तशी चिठ्ठी घेऊन आमच्या नातवंडांनीं त्या चिठ्ठीचे पैसे उगरावयाचे का ?

**बाळा०**—ह्मणजे ? मला तुमच्या ह्मणण्याचा अर्थ समजला नाहीं !

**वे० काका०**—हें बघा. तुमच्या काकासाहेबांना परमेश्वर उदंड आयुष्य देवो ! मी ऐकतों कीं तुमचे काकासाहेब अगदीं सशक्त, मजबूत अगदीं ज्वानासारखे आहेत. त्यांना पडसं कीं खोकला कसा तो माहीत नाहीं.

**बाळा०**—छे: छे: असं तुह्मांला कोणी सांगितलं ? भलतंच नाहीं तर ! हे पहा, काकासाहेब जितके दिवस जास्त राहतील तितके दिवस आमचा वारसा लांबला ही जरी गोष्ट खरी आहे तरी त्यांनीं पूरीं शंभर वर्षे खुशाल जगावं ! व हेंच मीं खरोखर मनापासून इच्छितों.

**वे० काका०**—( मनांत ) शाबास ! अगदींच हातांतून गेलेला दिसत नाहीं खरा ! ( उघड ) झालं तर ! मग तुमच्या इच्छेप्रमाणें ते आणखी पांच पंचवीस वर्षें रहाणारच !

**बाळा०**—छट्. असं कशावरून तुह्मी ह्मणतां ? अहो हीं पिकलेलीं पानं. केव्ह गळून पडतील याचा नेम आहे का ?

**वे० काका०**—( मनांत ) अरे गाढवा ! मी पिकलं पान का ? केव्हां गळून पडेल याचा नेम नाहीं का ? बरं ! बरं ! पाहून घेईन ! ( उघड ) हें पहा बाळासाहेब, तुमचे काका शंभर वर्षं राहोत, पाहिजे तर तुमच्या इच्छेप्रमाणें ताबडतोब पिकलेल्या पानाप्रमाणें गळून पडोत, आह्मांस त्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. आमच्या शिरस्त्याप्रमाणें कांहीं तरी खातरीलायक तारणाशिवाय आपणांस पैसे मिळणं कठीण !

**बाळा०**—( त्रासून ) छट्. विसाजीपंत, असं जर होतं तर यांना विनाकारण तसदी कां दिलीत ? ( उठून ) ठीक आहे तर ! तसदी माफ करावी. लोभ असावा हे विनंति !

**वे० काका०**—अति उतावळा स्वभाव आपला, रावसाहेब ! दुसरं कांहीं तारण नसलं तरी आपणांपाशीं वडिलोपार्जित चांदीचीं मूल्यवान भांडीं व इतर जिनसा असल्याचं ऐकिवांत आहे. त्यापैकीं कांहीं ठेवल्यात तरी चालेल.

**बाळा०**—( हंसून ) चांदीचीं भांडीं ! त्याची केव्हांच व्यवस्था झाली ! अशा जिन्सा ठेवून काय उपयोग ? उगाच गंज चढूं द्यावयाचा ?

**वे० काका०**—( मनांत ) अरे ! अरे ! चांदीच्या जिनसा पार झाल्या ! किती मूल्यवान् तरी होत्या ! व त्याबद्दल गाढवाच्या मनाला कांहींच वाटत नाहीं ! व दांत काढतो ! ( रागानें विसाजीपंतांस बाजूस बोलावून ) विसाजीपंत, आणखी काय परीक्षा पहायाची ! अगदीं निस्संग झालेला दिसतो !

**विसाजी०**—( हळूच ) हं, हं, काकासाहेब अम्मळ धीर धरा ! एवढ्यांत काय झालं !

**वे० काका०**—काय ह्मणतां ? तुम्हाला काय माहीत आहे ? वाडवडिलांच्या वेळेपासून आमच्या कुटुंबांत असलेलं चांदीचं सामान राजेरजवाड्यांतून माझ्या आज्यास भेटीदाखल मिळालेलं ! अरे ! या पोरानें सारं वाटेस लावलं ! काय हा अनर्थ ! बरं, बरं, मूर्खा, याचा चांगलाच मोबदला तुला मिळेल !

**विसा०**—काकासाहेब ! माझं एवढं ऐका. जरा धीर धरा—येथवर आल्यासारखं शेवटपर्यंत जाऊं द्या.

**वे० काका**—वरं तर ! मला तर येथें मुळींच आशा वाटत नाहीं ! ( उघड ) बाळासाहेब, आपल्या कुटुंबांत जुने निरनिराळ्या विषयांवर मोठाले मूल्यवान् ग्रंथ आहेत असंही ऐकिवांत आहे ! त्यांचा जरी आमच्या सारख्यांस उपयोग नाहीं तरी–

**बाळा०**—आपणाला आमच्या कुटुंबाच्या कारभाराची बरीच माहिती आहेसं दिसतं! कोणी दिली ? कांहो विसाजीपंत, आपलंच हें काम असावं. खरं कीं नाहीं ? बरं तें असो. हें पहा, लालाजी आमच्या वडिलांनीं असे ग्रंथ ठेविले होते खरे––

**वे० काका०**—ठेविले होते ह्मणजे ? त्यांची पण वाट लाविलीत काय ? भले–भले !

**बाळा०**—( हंसत ) वाट नाहीं लाविली त्यांना चांगला रस्ता लावून दिला. हें पहा, मी शाळेंत असतांना आमचे गुरू आह्मांस सांगत असत कीं, पैसा दुसऱ्यास दिला असतां नाहींसा होतो पण विद्याधन हें दुसऱ्यास दिलं असतां उलट वाढतं. अहो, आमच्या एका कवीनेंही म्हटलें आहे. " परि विद्याधन वाढे दिन दिन इतरांसी देतां हो ॥ " खरं की नाहीं विसाजीपंत ? ह्मणून एकटया तिमाजी नाईका सारखं कंजूसपणानें आपणांपाशींच एवढं शेंकडों वर्षांचं ज्ञान ठेवण्यापेक्षां—देऊन टाकलं दुसऱ्यांना, विकून टाकले सारे ग्रंथ, दुसरं काय ! ( हंसतो ).

**वे० काका०**—( मनांत ) बेशरम ! करून सवरून आणखी साव ! ( उघड ) बाळासाहेब ! हें सर्व ऐकून मला वाईट वाटतं. परंतु माझा नाइलाज आहे. दुसरा कांहीं हुकूम असल्यास—

**बाळा०**—अरे पण हो, बरी आठवण झाली. आपल्या एकंदरींत बोलण्यावरून मला असं वाटतं कीं आपणांस जुन्यापुराण्या जिनसांचा बराच शोक असावा. हें पहा. आमच्या थोरल्या दिवाणखान्यांत आमच्या वडिलांच्या थेट चवथ्या पिढीपासून तों आजपर्यंतच्या तसबिरी आहेत. कुशल चित्रकार रविवर्मा यांनीं काढलेल्या आहेत व तिगस्तांच त्यांना नव्या छानदार फ्रेमी किती तरी खर्च करून घातल्या आहेत. चला. तुम्हांस पसंत असतील तर त्या तसबिरी देऊन टाकतों तुम्हांला.

**वे० काका०**—काय, वाडवडिलांना विकून टाकतां ? छी ! छी !

**बाळा०**—हात्तीच्या ! त्यांत काय मोठं झालं ! तें कशाला ? तसा पैसा मिळत असल्यास मी स्वतांसही विकून टाकण्यास दोन पायांवर तयार आहें !

पैसा ! पैसा ! या जगांत पैसा आहे तर सर्व कांहीं आहे ! माफी असावी. तुम्हा मारवाडी लोकांस पैशाची खरी किंमत कधीं कळणें नाहीं. खरं कीं नाहीं विसाजीपंत ?

**चे० काका०**—पण साहेब, या तुमच्या तसबिरींवर पैसा कोण देणार ? त्यांची किंमत तुम्हाला–परक्यांना काय ? व तसबिरी कितीही मोलाच्या असल्या तरी त्यांची किंमत एवढी कोठून होणार ? तुम्हाला तर पांच हजार रुपये हवेत. खरं कीं नाहीं ?

**बाळा०**—हें पहा लालाजी, मला पैसा तर हवा आहे. तुमच्या म्हणण्याप्रमाणें तुम्ही तो देण्यास तयार आहां. पण तुम्हांस तारण पाहिजे आहे. आम्हीं तर अगदीं कफल्लक ! तर अशा अडचणीच्या वेळीं ह्या तसबिरी धूळ खात ठेवून काय करायच्या ? त्यांचा तरी उपयोग करून घेऊं या. हें पहा, तुम्ही घेत असाल तर ठीक, नाहीं तर करून टाकतों त्यांचें लिलांव, ज्याव !

**काका०**—शाबास ! वाडवडिलांचें लिलांव करून त्यांचा उद्धार होईल खरा. अरे ! अरे ! त्यांच्या कुळीं जन्म घेऊन–( पुढें बोलणार तों विसाजीपंत इशारा देतात तो पाहून चुप बसतात ).

**बाळा०**—तुम्हाला माझ्या वाडवडिलांची एवढी कींव कां बरं येते ? लिलांव माझ्या वाडवडिलांचें करायचें, तुमच्या नव्हे.

**विसा०**—( हळूच ) काकासाहेब, या वेळीं अगदीं पित्त मारून नेण्यांत मौज आहे. नाहीं तर, एथपर्यंत रचिलेला सर्व व्यूह ढांसळेल. तुम्ही स्वस्थ बसा. मी त्यांना जबाब देतों. ( उघड ) हें पहा, बाळासाहेब, यांना तुम्ही प्रत्यक्ष आज पहातां परंतु यांचा आपल्या पेढीशीं व काकासाहेबांशीं त्यांच्या आज्यापासून संबंध आहे. हे आपले बरं इच्छिणारे असल्यामुळें त्यांना जरा हा विचार रुचला नाहीं. असो, आपला जर तसाच आग्रह असेल तर—

**बाळा०**—आग्रह बिग्रह मी कांहीं समजत नाहीं. परवां दोन प्रहरीं तीन वाजल्या-नंतर मी त्या साऱ्या तसाविरीचे लिलांव करून टाकणार. त्याची खबर बाजारांतील दोन चार व्यापाऱ्यांस द्या व त्यांना जर तसबिरी पाहणे असेल तर जा आतां त्यांना

घेऊन या व दाखवा. ह्मणजे त्यांची किंमत त्यांच्या लक्षांत येईल. चला तर--हं--झटदिशीं चला.

**वे० काका०**—चला, विसाजीपंत, पाहूं तर या कशा तसबिरी आहेत त्या. बरं तर, रावसाहेब, येतों बरं, जय गोपाळ !

**बाळा०**—या बरं. ( विसाजीपंत व वेशधारी काकासाहेब जातात ) उगाच वेळ गेला. मित्रमंडळी वाट पहात बसली असेल. चला. ( मित्रमंडळींत परत जातात ).

---

## अंक २ रा–प्रवेश ५ वा.

### स्थळ–देऊळ.

( पुराण चाललें आहे. )

( कांहीं बाया पुराण ऐकताहेत. कांहीं आपसांत गोष्टी करताहेत. )

**रमाबाई**—( सावित्रीस येताना पाहून ) याहो सावित्रीबाई–या बसा तरी–

**उमाबाई**--हो बाई, यांना आतां मोठा मान दिला पाहिजे !

**सावित्रीबाई**—अन् तो कां बरं?

**उमाबाई**--अगबाई, हें काय विचारणं ! यजमानांचं पारडं चढलं ह्मणजे मग यजमानीणबाईचीही किंमत वाढली नाहीं का ?

**रमाबाई**--असं–असं. विसाजीपंतांबद्दल ह्मणतांना ?

**उमाबाई**—तसंच हो तसंच ! दुसरे कोणी का यांचे यजमान आहेत ? असल्यास नकळे.

**सावित्री०**—कां ? आज आमची थट्टा करण्याचा विचार आहे वाटतं ? करा–करा बाई–खुशाल करा.

**उमाबाई**--थट्टा कशी ? वाड्यांतला सारा कारभार आपल्या यजमानांच्या हातीं नाहीं का ?

**सावित्री०**--हात्याच्या ! त्यांत तें काय मोठं झालं ? अशा साखरेच्या गोणी वाहणारे बैल पुष्कळ असतात.

**उमाबाई**—हे पण तशांतले नव्हे हो. पेढीची सारी मुखत्यारी आपल्या यजमानांकडे-

सच आहे. शिवाय बाहेरगांवीं रहाणाऱ्या काकासाहेबांचाही व्यवहार त्यांच्याच हातीं नाहीं का ?

**सावित्री०**—कोणी ह्मणेल त्यांना विचारपूस करणारं कुणीच नाहीं !

**जानकीबाई**--तसं नव्हे हो ! पण अलीकडे वाड्यांत आपले यजमान जें करतील ती पूर्वदिशा असं ज्यांच्या त्यांच्या तोंडीं ऐकतों.

**सावित्री०**—शर्थ झाली बाई, या रिकामटेकड्या नसत्या उठाठेवी करणाऱ्या लोकांचीं! आणखी नाहीं का कांहीं हे उद्योगी लोक म्हणत ?

**उमाबाई**—अग बाई ! वाड्यांतल्या मंडळीसंबंधानें लोकांच्या वार्ता सगळ्याच सांगूं लागलं तर एक रामायण होईल रामायण !

**सावित्री०**—आणखी काय काय लोक बोलतात तें सांगा तर खऱ्या ! अंमळ करमणूक होईल !

**उमा०**—नकोग बाई, उगीच तुमच्या मनास वाईट वाटेल.

**सावित्री०**—माझ्या मनास कांहीं वाईट वाटायचं नाहीं. मघां सांगितल्या त्याच्याच जोडीच्या असल्यास खुशाल चालूं द्या—

**उमा०**—ऐकाच तर. लोक म्हणतात तात्यासाहेबांनीं दुसरी बायको आणली हें तुमच्या यजमानास पटलं नाहीं.

**सावित्री०**—ठीक ! ठकि ! तात्यासाहेब यजमानीण आणणार आणि यांचं कां पोट दुखतं ?

**उमा०**—तें बाई काय सांगावं ? मी आपलं लोक ह्मणतात तें सांगितलं.

**जानकी०**—अहो मी सांगतें कारण; कारण एखादी लहान पोर दिखील सांगेल. अहो नवी बायको आली, ती कांहीं लहान पोर नाहीं. ती आज नाहीं उद्यां सारा कारभार आपल्या हातीं घेतल्याशिवाय रहाणार आहे का ? मग यांचं खाद्य गेलं ! मग होती तशीच व्यवस्था चालू रहावी हें वाटणं साहजीकच नव्हे काय ?

**सावित्री०**—अहो पण—

**रमा०**—थांबाहो सावित्रीबाई, मी तुमच्या तर्फेनें जबाब देतें.

**सावित्री०**—कोणी नको हो माझ्या तर्फे बालिसटर; मीच जबाब देतें. पण पहि-

त्यानें ऐकूं द्या तर खरं सारं. बरंपण त्यांना पसंत नाहीं पडलं, तर नवरा बायकोस वेगळं ठेवलंय का ?

**उमा०**—वेगळं कशाला ठेवायला पाहिजे ? घरांत लेंक आहेना ? तिला शिकवून त्यादोघींमध्यें भांडण लावून दिलं ह्मणजे झालं आयतंच काम ! ह्मणतात ना काडी मोडायला नको नी डोळा फोडायला नको !

**जानकी०**—हो बाई, आमच्या इथें वाड्यांतील गजरी येत असते. ती सांगते बाई तेथल्या भांडणाची गम्मत ! जशी एखादीं कुत्रीं मांजरं भांडतात तशीं त्यांचीं भांडणं होतात.

**रमा०**—अहो पण त्यांचीं भांडणं झाली ह्मणून बिचाऱ्या विसाजीपंतांचा त्यांशीं काय संबंध ! पूर्वीच्या संबंधाचीं मुलं बाळं असतांना दुसरी बायको आणली ह्मणजे अशीं भांडणं व्हायचीच ! ही जगाची रीतच आहे. पण त्यांत उगचि त्या विसाजीपंतांना कां रगडतां ?

**सावि०**—बरं आणखी काय लोक ह्मणतात ? ऐकूं तर द्या.

**जान०**—हो बरी आठवण झाली. गजरीच ह्मणत होती, बाईनें यजमानास अगदीं मुठींत ठेवलं आहे. कोणाचं चालूं देत नाहीं. यजमान पण अगदीं बाईलबुद्धे बनले आहेत. त्यांना तिच्या खेरीज दुसरी दिशाच माहीत नाहीं. लेकीचे तर इतके हाल मांडले आहेत कीं बापडीला दोन दोन दिवस उपास काढावे लागतात !

**उमा०**—अहो, उपासच काय ? मागल्या नवरात्रांत असंच कांहीं निकराचं भांडण होऊन, लेंकीला चार पांच दिवस कोंडून ठेविली होती. मग ह्मणे पंत मधें पडले तेव्हां सोडली.

**जान०**—कोंडील बाई ती ! आहेच तशी द्वाड ! आणि त्यांत तिला तात्यासाहेबांची फूस, मग काय विचारतां ! आधींच बाई नाचरी, त्यांत बांधली घागरी !

**वाराणशीबाई**—खरंच बाई, ती काय करील आणि काय नाहीं ? त्याबुवाच्या, ऐकलंतना, नादीं कशी लागली आहे ती ?

**उमाबाई**—कोणताहो बुवा ?

**वाराणशी०**—वाहवा ! जसं कांहीं यांना बुवाबद्दल कांहींच ठाऊक नाहीं. जाऊन पण आल्या असतील तिथून. पक्या हो बाई तुह्मी दिसतां !

**रमाबाई**—अहो, त्यांचं राहूंद्या. या बुवासंबंधीं सांगा तर खऱ्या—

**वाराणशी०**—काय बाई सांगावं. बाईसाहेब यजमानांसह इतक्या कांहीं त्या बुवाच्या नादीं लागल्यात कीं जनांत हंसू होऊं लागलं आहे.

**रमाबाई**—अहो, यानांहो बुवा कशास हवा? किमीया बिमीया करणारा आहे कीं काय?

**जानकी०**—काय तरी तुह्माला रमाबाई ह्मणावं! अहो किमीया कशाची आली? त्यांना पोर हवं आहे पोर!

**रमाबाई**—बाई-बाई-या आतांच्या पोरींना केवढी तरी घाई! मेलं लगीन होऊन दिवस तरी किती झाले?

**कृष्णाबाई**—आणि देव तरी पहा कसा! जिथं नको तिथं पोरं न् पोरं! आणि नवस नी नेम नी व्रत करून दे दे मागतात तिकडे एकही नाहीं!

**रमाबाई**—अहो पण बायको एक वेडी झाली, पण तात्यासाहेबांसारखे पोक्त, शहाणे तिच्या नादीं लागून हे वेडे चाळे कसे करतात?

**सावित्री०**—ते पण आमच्या इथल्या शिकवणीनें नाहीं का? हो बाई नेम काय सांगावा? लोक तसं ही ह्मणावयास चुकणार नाहीं.

**वाराणशी०**—तसं कांहीं ऐकलं नाहीं. पण ह्मणे त्या बुवाच्या नादीं लागून-पैशाची बरीच खराबी झाली आहे.

**जानकी०**—कोणी ह्मणतात बुवानें बाईस मोहिनी घातली आहे. पाहिजे तें तिच्या पासून काढतो. व बुवाच्या मठांत रात्रीं प्रहर नी प्रहर बसलेल्या असतात-सेवा करीत. आहे कीं नाहीं मजा?

**रमाबाई**—खरंच कीं काय? छेः बाई, यापासून परिणाम धड निघेलसा दिसत नाहीं. आणि हा बुवा तरी कशावरून लबाड लफंगा नसेल? कशावरून 'लोक ह्मणती बुवा बुवा-नकळे गुलामाचा कावा' अशांतला नसेल? या बुवाच्या आणखीही गावांतील पांचचार श्रीमंत घराण्यांतल्या बाया नादीं लागल्याचा बोभाटा आहे.

**जानकी०**—कांहो राधाबाई, तुह्मी गेल्या होत्यातना त्या बुवाकडे? तुमचा काय अनुभव तो आम्हांस कळवाल कीं नाहीं?

**राधाबाई**--अहो, कसचा बुवा नी कसचं काय! नांव नको बाई त्या बुवांचें पुन्हा!

**जानकी०**--कां बरं? असं काय झालं? तो तुह्माला चावला कीं डसला? असं काय त्यानें केलं?

**राधाबाई**--चावतोय न् डंसतोय कशाला! पण मी तरी एक दोन वेळांच गेलें होतें. तें पण आमच्या शेजारच्या काकूच्या आग्रहावरून. ह्मणे तो अस्सं करतो नी तस्सं करतो,! वांझेस पोरं देतो! येवढंही सांगितलं तरी मी जात नव्हतें. तिकडे अशा गोष्टीवर बिलकूल विश्वास नाहीं. मी काकूस तसं सांगितलं दिखील. पण त्या कुठं ऐकायच्या! शेवटीं दोन दिवस हफिसाच्या कामाकरितां नाशकास जायचं झालं. ती संधी साधून काकूंनीं आपला हेतू साधलाच. नाहीं हो करितां दोन वेळां मी गेलें त्यांच्या बरोबर. पण त्यांना तें कळल्यावांचून का रहात. कळल्या बरोबर–नको वाई ती आठवण!

**जानकी०**--कां? घोड्याच्या चाबकाची नी पाठीची गांठ पडली कीं काय?

**राधाबाई**—घोड्याचा चाबूक कशास हवा? हात तर कुठं गेले नाहींत ना?

**जानकी०**—असं, असं, तर मग बुवांचा आशीर्वाद तुह्माला चांगलाच फळला ह्मणायचा!

**राधाबाई**—हो बाई, पुन्हां त्याचं नांव नको. आपणां गरिबांना हे चाळे हवेत कशाला? हे बुवा नी बाया यांच्या नादीं लागण्यापेक्षां आपले देव, महादेव, गणपति, मारुती, हे काय कमी आहेत? यांची भक्तिभावानें सेवा केलेली बरी! आणखी मी बाई हें समजतें. पोरबाळ नशीबीं असेल तरच तेवढंच लाभेल. नशीबीं जर नाहीं तर बुवाचा अंगारा घ्या, तीर्थ घ्या, पाहिजे तें करा. अंहः नाहींच नाहीं!

**जानकी०**--पण हा अनुभव तुह्मांला चौदावं रत्न दिसल्यावर आला! असो. पण कांहो सावित्री बाई. आपले विसाजीपंत पण या बुवाच्या नादीं लागलेत कीं नाहीं?

**सावित्री०**—तें मला कां विचारतां? लोक काय ह्मणतात त्याविषयीं तें ऐका. जसं इतर सगळं तुह्मांला लोकांकडून कळलं तसं तेंहीं कळेल. बरं बाई, पुष्कळ वेळ झाला! देवदर्शनासाठीं आलें तें तुमच्या तावडींत सांपडलें. असो. बोलल्याचालल्याची माफी करा बायांनो, येतें बरं— (जाते).

**जानकीबाई**--तिळपापड झाला असेल अगदीं! तुह्मी तरी बाई जबऱ्या. त्यांच्याच तोंडावर त्यांच्या यजमानाविषयीं चर्चा करितां.

**उमाबाई**--होईना तिळपापड! खरं बोलण्याला काय भीड नी भाड! अहो तुह्मांला काय माहीत आहे? बाई गरीब दिसते त्यावर जाऊं नका बरं! मोठी तोऱ्याची आहे हो! काय ह्मणे यजमानास कुणी विचारणार आहे कीं नाहीं? अहो लोक ह्मणतात पंतानीं कांहीं नाहीं तरी जवळ जवळ पंचवीस हजारांचा ऐवज गांठीं केला आहे! हा कुठून आला बरं? आकाशांतून का पडला?

( अन्नपूर्णाबाई येतात. ).

**अन्नपूर्णाबाई०**--अगबाई! किती तरी वेळ झाली ही! मी आलें खरी पण तुमची गांठ पडते किंवा नाहीं याचा संशयच होता.

**रमाबाई**--कां बरं?

**अन्नपूर्णा०**--काय सांगू! अहो आज शेजारच्या हवेलींत किती व्यापारी—मुसलमान नी वोहरी नी दुसऱ्या जातींचे—सकाळ उजाडल्या पासून ही गर्दी! कोणी ह्मणे व्यापाऱ्यांची सभा भरायची आहे, कोणी ह्मणे हवेली भाड्यानें देणं आहे, ह्मणून लोक बघायला येताहेत, असं कोणी कांहीं कोणी कांहीं सांगू लागले. पण खरं कायतें कळेना.

**उमाबाई**--खरंच, एवढी आग शेजारीं पेटल्यावर आमच्या अन्नपूर्णाबाईच्यानें गुप-चीप रहावेल?

**अन्नपूर्णा०**—तुह्मी पाहिजे तें म्हणा, माझ्यानं स्वस्थ बसवेना. स्वयंपाक ही सुचेना. कसा बसा आटोपला कारभार नी वर माडीवर गेलें व बाजूची खिडकी उघडली. तींतून हवेलींतल्या दिवाणखान्यांत काय होतं तें साफ दिसतें. तिथें पहातें तों कुणी हें पिकचर पहा कुणी तें पिकचर पहा, सगळे पिकचरेंच पहात होते.

**जानकी०**—अहो तें एक्झीबीशन कीं फेक्झीबीशन ह्मणजे प्रदर्शन ह्मणतात ना तसं कांहीं असेल! असलीं प्रदर्शनं अलीकडे जिकडे तिकडे करावीं असा सरकारानें हुकूम केला आहे ह्मणे, असं कांहींसं आमच्या रामूनें त्याच्या शाळेंतल्या मास्तरापासून ऐकलं होतं खरं!

**रमाबाई**—शाबास हो बाई तुमच्या शहाणपणाची! मास्तरांनीं सांगितलं-रामूनें ऐकलं-त्यावर तुह्मी मदार एवढी बांधलीत. पण खासगी हवेलींत प्रदर्शन होतं कां?

**अन्नपूर्णा०**—कसचं हो प्रदर्शन घेऊन वसलांत ? मी तशी स्वस्थ का वसणार ? आमच्या कुशाला पाठवून खबर आणली न काय ? काय मेला चमत्कार तरी ! उद्यां ह्मणे त्या पिकचरांचं लिलांव होणार आहे !

**सखूबाई**—हें ग बाई नवीन काय ? जें जें ऐकावं तें नवंच !

**जानकी०**—तसं नसेल हो ! हवेलीचं लिलांव असेल !

**राधाबाई**—हो, हो, तसंच असलं पाहिजे. परवांच आमचे कडले ह्मणत होते कीं बाळासाहेवांनीं कर्जाचे डोंगर करून ठेवले आहेत. हें कर्ज स्थावर विकल्या खेरजि फिटणार तें कसं ?

**रमाबाई**—तसं असेल किंवा कर्जदार हवेली विकून टाकीत असतील. नाहीं तर लिलांव करावयाची काय जरूरी ?

**उमाबाई**—तुह्मी ह्मणतां तसंच असलं पाहिंजे. कर्जदार विकत असतील ह्मणून लिलांव. नाहीं तर खाजगी रीतीनें विकायला काय हरकत होती ?

**रमाबाई**—तें बाई तुह्मांला ठाऊक ! उगीच नाहीं यजमानानीं आज इतकीं वर्षं वकीलाच्या हफीसांत नोकरी केली !

**राधाबाई**—अहो उमाबाई, तुह्मी ह्मणतां तसंच हो. या पहा त्रिवेणीबाई सांगताहेत कीं बाळासाहेवांनीं कर्ज अतोनात केलं आहे. त्यांच्यावर वारंटं ही निघालीं आहेत. परवां एका कर्जदारानं पकडलं होतं. मग तात्यासाहेबांनीं पैसे भरले तेव्हां राजश्री सुटले.

**जानकी०**—अहो त्यांचे काका येताहेत असं ह्मणतात. तर ते याचसाठीं तर येत नसतील ना ?

**उमाबाई**—यांत काय संशय ! पुतण्याचे पराक्रम ऐकून ह्मातारा येईल नाहीं तर काय करील ? तेथें स्वस्थ बसले तर इथें हे राजश्री सारी इस्टेट कधींच फुंकून टाकतील ना ?

**राधाबाई**—अहो, उद्यांना लिलांव आहे ?

**अन्नपूर्णा०**—हो, उद्यां दुपारीं दोन की तीन वाजतां.

**उमाबाई**—मी, बाई, अद्याप कधीं लिलांव बघितलं नाहीं.

**जानकी०**—आपणही कागद पत्रांत वाचतों पण प्रत्यक्ष नजरेनें लिलांव कसं तें अजून पाहिलं नाहीं.

**उमाबाई**—बरं तर. अन्नपूर्णाबाई, आह्मीं उद्यां तुमच्या इथं येऊं. जरा पाहूं तर खरी गम्मत लिलांवाची !

**अन्नपूर्णा०**—घर तुमचंच आहे, खुशाल या.

**उमाबाई**—ठरलं तर. अहो, रमाकाकू-जानकीबाई-कृष्णाबाई-सखूबाई-ठकूबाई-तुह्मी साऱ्या आमच्या इथं या. आपण सगळ्या मिळून अन्नपूर्णाबाईच्या घरीं जाऊं.

**अन्नपूर्णा०**—चला बाई, गप्पा गोष्टी पुष्कळ झाल्या. राहिल्या उद्यां करूं. पुरुष मंडळी पण यायला लागली. चला.

( देवदर्शन घेऊन आपापल्या घरीं जातात. )

# 'ढोंगी दुनिया'
## अर्थात्
# 'जें सारें चकाकतें तें सोनें नव्हे.'



( मागील अंकावरून पुढें चालू. )

## अंक २ रा—प्रवेश ६ वा.

**स्थल**—दिवाणखाना.

( ठिकठिकाणीं तसबीरी टांगलेल्या आहेत. )

काकासाहेब ( पूरनमल मारवाड्याच्या वेषानें ) विसाजीपंत, बाळासाहेब, त्यांची मित्रमंडळी व कांहीं व्यापारीलोक.

**बाळासाहेब**—विसाजीपंत, आतां जास्त मंडळीची आशा करण्यांत हांशील नाहीं. वेळ बराच झाला. लिलांवास सुरुवात करावी असें मला वाटतें. ( तसबिरीकडे तोंड करून ) मम परम पूज्य वाडवडिलांनों! आजचा हा प्रसंग अति दिलगिरीचा आहे. इतकीं वर्षें आपला सांभाळ केला. परंतु आतां माझा निरुपाय आहे. माझ्या

काकासाहेबांच्या एका गरीबीनें अति पिडलेल्या मित्रास मदत करण्याकरितां व माझ्या स्वतांच्या गरजेकरितां मला सांप्रत पैशाची फार जरूर आहे. पण या काळांत खालीं हातावर पैसा मिळणें अति मुष्कील ! हें आपणांस सांगितलें पाहिजे असें नाहीं. तेव्हां म्यां काय करावं ! मी कृतघ्न नाहीं. आपले माझ्यावर प्रत्यक्ष व अप्रत्यक्षरीतीनें झालेले उपकार मी विसरलों नाहीं. व माझ्या अडचणीच्या वेळीं देखील तुह्मीं मला इतके उपयोगी पडत आहां हाही आपला मोठा उपकार मी माथीं चढवितों ! क्षमा असावी ! ( मंडळीस ) गृहस्थहो ! हे सारे आमचे वाड-वडील. यांना विकणें आहे. कांहीं तसबीरी अस्सलांवरून प्रसिद्ध चित्रकार रवीवर्मा यांच्या हातानें नवीन करून घेतल्या आहेत. कांहीं दुसऱ्या प्रसिद्ध चित्रकारांनीं काढलेल्या आहेत. परंतु सर्वांस दोन वर्षांवर नव्यानें वारनीस देऊन नव्या फ्या-शनच्या सोनेरी फ्रेमी घातल्या आहेत. आमच्या वडिलांपैकीं कांहीं मोठमोठे प्रसिद्ध पुरुष होऊन गेले आहेत ! झालं. प्रस्तावना पुरे झाली. आतां आजच्या कामास सुरु-वात होऊं द्या. चला-विसाजाजीपंत खुर्चीवर उभेराहून—

**मित्र**—हं हं ! तें काम विसाजीपंताकडून होणें नाहीं. मी लिलांववाल्याचं काम करितों.

**विसाजीपंत**—ठीक ! ठीक ! आपण तें काम ठीक कराल.

**बाळा०**—बरं तर पहिली तसबीर ती मधोमध टांगली आहे ती घ्या. ते कोण ? आमचे प्रपितामह उर्फ पणजे. पोशाग-पगडी-पेहेराव सर्व जुन्या तऱ्हेचा खरा. पण चेहेरा कसा तेजःपुंज दिसतो ! हे आमच्या पेढीचे मूळ पुरुष सबब यांचा मान पहिला. जाऊं द्या यांना पहिल्यानें तर. पहिली बीड कोण करतो ?

**१ ला व्यापारी**—पांच रुपये—

**वे०काका०**—( रागानें ) कोण ह्मणाला पांच रुपये ? कांहीं विचार केला ? आमच्या—

**विसाजी०**—( हळूच ) हं, हं, हें काय करतां ? अशानें सर्व फुटेल ! मी आपणांला सांगतों. कांहीं ही होवो ! प्रत्यक्ष तुमचाही अपमान झाला तरी घटकाभर सहन केला पाहिजे.

**२ रा व्यापारी**—वीस रुपये—

**वे० काका०**—पन्नास रुपये—

**मित्र**—फिपटी रुपी. फिपटी रुपी. ट्ट्याईम-फिपटी रुपी-थ्री टाईम-फिपटी रुपी. विसाजीपंत, लिहा लालाजींच्या नांवावर.

**बाळा०**—दुसरी तसबीर कोणती घेतां ? हे आमचे पितामह उर्फ आजे. त्यांच्याच जवळ ती दुसरी आहे ती कोणाची बरं ? हं हं, त्या आमच्या आजीबाई. विसाजीपंत, या वेगळ्या विकावयाच्या नाहीं बरं. जाऊंद्या त्यांना जोड्यानें ! बोला-लालाजी-किती रुपये ?

**वे० काका०**—एक एक वेगळी नाहीं विकायची ? त्या म्हाताऱ्या बाईची तसबीर घेऊन काय करायची ?

**बाळा०**—तें मी कांहीं समजत नाहीं. या जोडप्याचें एकमेकांवर केवढं तरी प्रेम होतं. कधींही एकमेकांपासून वेगळीं राहिलीं नाहींत. येथपर्यंत कीं आजोबा शेवटचे दुखण्यांत पडले तें पाहून आजीबाईनींही बिछाना धरिला. व आजोबा निवर्तल्यावर ताबडतोब त्यांनींही स्वर्गाची वाट धरली. याला म्हणावं नवरा बायकोचं प्रेम. नाहींतर हल्लींचीं जोडपीं ! एकाचं तोंड पूर्वेकडे तर दुसऱ्याचें पश्चिमेकडे ! येथेंही हीं चित्रं एकमेकाजवळ आज किती वर्षे लटकत आहेत. तेव्हां त्यांच्यांत आतां विघड पाडणं हें महत्पाप होईल असं मला वाटतं.

**वे० काका०**—( मनांत ) याच्या वेडेपणांत ही रीत आहे असं दिसतं. असो ! ( उघड ) बरं तर. जशी धन्याची मर्जी-पन्नास रुपये—

**१ ला व्यापारी**—अरे ! अरे ! हें तुम्ही काय करतां ? काय मांडलं आहे तुम्ही ? अशी एकदम किंमत काय चढवतां ? माझे साठ रुपये—

**वे० काका०**—पाऊणशें-पाऊणशें—

**मित्र**—सेवंटी फाईफ्-वन्स. सेवंटी फाईफ्-टू टाईम. सेवंटी फाईफ्-थ्री टाईम-सेवंटी फाईफ्. लालाजींच्या नांवीं.

**२ रा व्यापारी**—छेः अशा रीतीनें आपली येथें डाळ शिजेलसी दिसत नाहीं. हे लालाजी सगळ्याच तसबीरी घेऊन टाकणार वाटतं !

**बाळा०**—विसाजीपंत, आतां ते घोड्यावर विराजमान झालेले कोण बरं ते ?--हं, मघांच्या आजोबाचे धाकटे बंधु. घ्या त्यांना. हे पेशवाईत मोठे सेनापती होते बरं. यांनीं मोठमोठीं शौर्याचीं कामं केलीं आहेत. यांनां थोडक्यांत जाऊं द्यावयाचंनाहीं बरं.

**वे०काका०**—(मनांत) गाढवाला वडिलांचा अभिमान आहे खरा. पण उपयोग काय ? एके बाजूनें शाबास म्हणून पाठ थोपटावयाची व दुसरे बाजूनें मूर्ख म्हणून थोबाडींत लगावयाची ! (उघड) रावसाहेब, मला देखील शूर लोकांचं मोठं कौतुक वाटतं. व अशा साठीं माझ्या मनांत मोठा पूज्य भाव असतो. सबब-ध्या माझी बींड-पन्नास रुपये—

**२ रा व्यापारी०**—गृहस्था-पन्नासाखालीं तुला बीडच करतां येत नाहीं का ?

**मित्र**—फिपटी रुपी-फिपटी रुपी-फिपटी रुपी. थ्री टाईम-लिहा लालाजींच्या नांवावर—

**२ रा व्यापारी**—अरे हा मारवाडी वेडावीडा तर नाहींना ?

**३ रा व्यापारी**-मला वाटतं यानें जन्मांत कधीं तसबीर म्हणून बघीतलीच नसावी !

**१ ला व्यापारी**—लालाजी तुह्मी फाजील किंमत देत आहां. बरं दुसऱ्या कोणाला कांहीं तरी घेऊं द्याल कीं नाहीं ? कीं तुह्मींच सगळीं घेऊन टाकणार ?

**वे० काका०**—(हंसून) तुह्मांला पसंत असेल तर खुशाल घ्या तुह्मीं. माझी कोणाला मनाई नाहीं. खुशीचा सवदा ! खुशीचा सवदा !

**२ रा व्यापारी**—मला वाटतं याला दिवाळं काढायचं आहे. नाहीं तर असे वेड्या सारखे चाळे करताना !

**बाळ०**-पंत-अहो ती अक्कडबाज पगडी चढवून मोठ्या डौलामध्यें कोचावर बसले आहेत ते कोण समजलेत का ? ते आमच्या चुलत आज्यांचे कनिष्ट चिरंजीव. त्यांची होऊं द्या आतां पाठवणूक. यांचा तेवढा डामडौलच पाहून घ्यावा. 'देखनेमे ढब्बू-चलनेमे शिवराई'! विशेष प्रतिष्ठा नाहीं ! माझ्यासारखेच हे एक चंडूलाल होते ! खुप चैन मारली ! व यांच्या पराक्रमानें वडिलांच्या दौलतीला व नांवाला बराच चट्टा बसला. फन्ना उडविला यांनीं ! जाऊं द्या तर यांना यांच्या योग्यते प्रमाणें !

**वे० काका०**—(मनांत) शाबास ! शाबास ! गुणाची पारख करणारा तसाच स्पष्ट-वक्ता खरा ! हे गुण आजकाल पाहूं गेलें असतां थोडक्यांत सांपडतील ! असो ! आणखी काय प्रगट होतं तें पाहूं या. (उघड) आह्मांला त्यांच्या गुणावगुणांसी काय करायचं आहे ? तसबीर सुंदर दिसते. पंचवीस रुपये—

**१ ला व्यापारी**—तीस रुपये–तीस—

**वे० काका०**—चाळीस–पंचेचाळीस–पन्नास—

**बाळा०**—जाऊंद्या. पन्नास फाजील किंमत आली ह्मणावयाची. जाऊंद्या. ( लाला॰ जीच्या नांवावर लिहितात. ) बरं तर, आतां पाळी कोणाची ?

**वे० काका०**—ते मोठे कल्लेवाले कोण ? भली भव्य मूर्ती दिसते.

**बाळा०**—कोणतेहो विसाजीपंत ? हं. हं. ते का ? ते आमचे वडील. त्यांनीं आम्हा दोघां भावांसाठीं पुष्कळ दौलत ठेविली आहे. पण शहाणपणा असा केला कीं सगळ्या इस्टेटीचं ट्रस्ट करून ठेविलं. फक्त उत्पन्न आह्मांस मिळावयाचं. एके रीतीनें ही आमच्या फायद्याची गोष्ट खरी. परंतु–पण तें तुह्माला परक्याला सांगून काय उपयोग ? पण ही दौलत त्यांनीं आह्मांसाठीं ठेविली हें चांगलं केलं असं मी ह्मणणार नाहीं. श्रीमंताचे चिरंजीव ह्मणून हे आमचे असे हाल ! श्रीमंतीनें आह्मीं बिघडून गेलों ! गरीबाचे चिरंजीव असतों तर चांगला धंदा रोजगार करून अब्रूमध्यें मीठ भाकर तरी खाऊन राहिलों असतों. असे आळशी उनाडटप्पू झालों नसतों ! असो. जाऊंद्या यांना—

**वे० काका०**—अरे ! अरे ! केवढीही कृतघ्नता !

**१ ला व्यापारी**—दहा रुपये—

**वे० काका०**—पाऊणशें–पुरे शंभर.

**बाळा०**—जाऊंद्या. फार किंमत आली ह्मणावयाची. (लालाजींच्या नांवीं मांडतात) लालाजी, माझ्यामतें या तसबीरीस शंभर रुपये फाजील झाले. ह्मणून या तस-बीरीबरोबर तिच्या दोहों बांजूंच्या दोन्ही तसबीरी तुह्मांस बक्षीस–ज्याव. विसाजीपंत, मुख्य मुख्य तसबीरी तर गेल्या. आतां किरकोळ राहिल्या. त्या एक एक विकायला काढणं म्हणजे आणखी कितीतरी वेळ लागेल. तेव्हां असं करा–त्या सर्वांचा करा एक लाट व टाका फुंकून एकदम—

**वे० काका०**ठीक ! ठीक ! नामी विचार. मी पण तेंच म्हणत होतों. दोनशें रुपये सब लाट—

**व्यापारी०**—शर्थ झाली या मारवाड्याची !

**वे० काका०**—सब लाट. दोनशें रुपये–कबूल ?

**बाळा०**—भले! भले लालाजी! आज पावेतों या बिचाऱ्यांची विचारपूस कोणी ही केली नाहीं. पण तुम्हीं मात्र खरी पारख केलीत! ठीक आहे. दोनशें रुपयाला घेऊन जा हा सगळा लाट. त्यांत आमचे मामा–मावशे–चुलत चुलते–चुलत चुलत चुलते–एक व्याहीपण पुरवणासाठीं म्हणून आहेत!

**वे० काका०**—फार चांगलें. पण त्यांत ती पलीकडील साध्या फ्रेमींतील तसबीर पण आली ना?

**मित्र**—त्या तसाबिरीशीं काय करायचं आहे तुह्माला लालाजी? तें रडव्या तोंडाचें अपशकुनी चित्र कशाला पाहिजे? असेल कोणा रडथोबडया चुलत्याबिलत्याचें!

**बाळा०**—अरे तोंड संभाळ! तूं रडथोबडा–रडव्यातोंडाचा कोणाला म्हणतोस? तें चित्र कोणाचं माहीत आहे का? तें आमच्या काकासाहेबांचं! खबरदार पुन्हां असं भलतं सलतं बोलशील तर!

**वे० काका०**—( स्वताशीं ) शाबास! माझा पुतण्या खरा तूं! ( उघड ) रावसाहेब, तें चित्र मला खरोखर फारच आवडतं. मी तें घेणार.

**बाळा०**—मी तें नाहीं देणार—

**वे० काका०**—पण माझ्या मनांत ती तसबीर फार भरली आहे. व त्यासाठीं किती जरी पैसे द्यावे लागले तरी मला परवा नाहीं. कांहींही होवो मी ती घेणार.

**बाळा०**—छेः ती तसबीर कांहीं केलं तरी तुम्हांला मिळणं नाहीं. ती माझ्या परम पूज्य काकासाहेबांची! माझ्या कुलदैवताची! समजलांत?

**वे० काका०**—( स्वतांशीं ) शाबास! बाळासाहेब, यानंतर तुझें प्रेम माझ्यावर नाहीं असं कोण म्हणेल? हातच्या कांकणास आरसा कशाला? पण हें वरवर आहे कीं खरं खरं आहे तें जरा पाहूंया. ( उघड ) रावसाहेब, मला एक वाईट खोड आहे. ती ही कीं माझ्या मनांत एकदां भरलं कीं अमुक वस्तु घ्यावयाची मग ती प्राप्त होण्यासाठीं किती कां पैसा पडेना–मी पाठीमागें हटणारा नाहीं. पैशाची काय मोठी बिशाद आहे? या एका तसबिरीसाठीं–घ्या रुपये पांचशें–( खिशांतून पैसे काढ लागतात ).

**मित्र**–( हळूच ) बाळासाहेब तुला वेड तर नाहीं लागलं? एक येवढंसं चित्र तें काय व त्यासाठीं हा पांचशें रुपये देतो काय! अशी किंमत एरवीं येणार होती

का ? टाक देऊन. नाहीं तर त्याचा विचार फिरला बिरला तर पुन्हां अशी संधि येणें कठीण. तशांत ही तसबीर गेली ह्मणून काय झालं ? त्याच्या पाहिजे तेवढ्या नकला करवून घेतां येतील. हात्तेच्या ! पण असा लुट्टन घेण्याचा योग पुन्हां येणं नाहीं.

बाळा०—हें पहा, पैसा मिळविण्याला देखील सीमा आहे. काय, केवळ पैशासाठीं ज्यांना मा आजपर्यंत बापाठिकाणीं समजत आलों, ज्यांचें माझ्यावर बापाप्रमाणें प्रेम, त्यांच्या या तसबीरीचा–तसबीर झाली म्हणून काय झालं–मी असा अनादर करूं ? नाहीं ! नाहीं ! लाख रुपये कां मिळेनात. जोंपर्यंत ही तसबीर लावून ठेवण्यास मजपाशीं वीतभर जागा आहे तोंपर्यंत ती मी जवळ ठेवणार–ठेवणार–ठेवणार !

वे०काका०—( स्वगत ) बस्स, याच्यापेक्षां ती जास्त काय परीक्षा पहावयाची ! आजपर्यंतचे सर्व अपराध माफ तुला–जा ! ( उघड ) पण रावसाहेब, मला ही तसबीर जाऊं द्यावीसी वाटतच नाहीं. हें पहा ! बाकीची सर्व चित्रांची जी किंमत दिली आहे तेवढी सगळी या एका तसबीरीस देतों. आणखी तें काय पाहिजे ?

मित्र—बाळासाहेब, माझं खरं मत विचारशील तर मला असा संशय येतो कीं हा लालाजी 'ल्युन्याटिक् असायलम्' मधील सुट्टन पळून आलेला एखादा रोगी तर नसेल ना ? पहा हो ! नाहींतर असं मात्र होऊं नये कीं याच्या पाठीमागें तेथील शिपाई येऊन त्याला घेऊन जातील व ही सर्व खटपट व्यर्थ जाईल ! असें झाल्यास आपलं मात्र हंसं होईल !

बाळा०—वेडा कशानें आहे ! तुला मला वेड लावील. आणखी हें पहा, तुह्मांला लालाजी या तसबीरी कां विकत घेत आहेत याचें नवल वाटत असेल. पण मला नाहीं वाटत. कां ह्मणशील तर एक तर लालाजींना जुन्या वस्तूंचा शोक आहेसा दिसतो. व त्या दिवशीं लिलांवाची गोष्ट काढली तेव्हां ती त्यांना रुचली नाहीं यावरून या तसबीरी दुसऱ्या कोणा परक्याच्या हातीं जाऊं नये ह्मणून त्यांची कमी जास्त किंमत देऊन आपणच ठेविल्या असाव्या. नाहीं तर आमच्या वाडवडीलांच्या तसबीरी घ्याव याच्या भानगडींत ते कां पडले असते !

मित्र—असो ! पण मला वाटतं—तोंडाच्या गपाट्या पुष्कळ झाल्या. आतां पैसे काढायला लावावं ह्मणजे खरं कायतें आपोआप बाहेर पडेल.

**बाळा०**—बरं तर. अहो पंत, हिशेब करा पाहूं. लालाजींचा आंकडा किती झाला ?

**विसाजी०**—( हिशेब करून ) पांचशें पंचवीस रुपये झाले.

**मित्र**—लालाजी, समजलांत का ? तसबीरी भराभर घेतल्यात सर्वांवर चढाओढ करून पण रकम मोठी झाली ! आहे का खिशांत ?

**वे०काका०**—किती झाले ? सव्वा पांचशें--( खिशांतून काढून ) हे घ्या—

**बाळा०**—( मोजून ) लालाजी, तुमची मोजण्यांत चूक झाली, वाटतं–ह्या आठशेंच्या नोटी आहेत.

**वे०काका०**—( हंसत )राहूंद्या–राहूंद्या–वरचे ठेवा त्या तसबिंरीसाठीं--ह्मणजे झालं कीं नाहीं ? ज्यास्त पाहिजे असल्यास आणखी दोनशें देतों--ह्मणजे पुरे हजार होतील ! एक हजार !

**बाळा०**—हें पहा लालाजी, मला हा लोचटपणा बिलकूल पसंत नाहीं. मी एक वचनाचा माणूस आहें. एकदां नाहीं शंभरदां सांगितलें तरी ध्यानांत येत नाहीं ! नाहीं तर हे घ्या सारे पैसे तुमचे--राहूंद्या आमच्या तसबिरी ! हं–चला घ्या-पंचाईत नको !

**वे० काका०**–बरं–बरं–इतका राग नको यावयाला–ते मजकडून तुह्मांला बक्षीस ! तुमची तुमच्या काकासाहेबांवरील भक्ति व प्रेम पाहून मला अति आनंद झाला ! असं प्रेम विरळा ! भेटूं द्या मला पाहूं तुह्मांला एकदां कडकडून ! मला देखील असा एक पुतण्या आहे–त्याचेंही असेंच प्रेम माझ्यावर आहे ! त्याची मला या वेळीं आठवण झाली. ( भेटतात ). बरं तर–मी आतां रजा घेतों–रामराम !–मंडळी--राम राम !—

**बाळा०**—यावं–या बरं–( लालाजी विंसाजीपंतासह जातात. विसाजीपंत लगेच परत येतात ) लेहरी गडी तुमचा मारवाडी–फार लेहरी ! विसाजीपंत, तुह्मांला नवल वाटत असेल कीं अशा वेळीं माझ्या मनास कांहींच वाटत नाहीं. छे. छे. ज्याप्रमाणें प्रत्यक्ष अगदीं नजीकच्या नातलगाचा वियोग होतानां मनाला दुःख होतं–तसंच–त्याहूनही जास्त मला एक एक तसबीर काढून टाकतांना होत होतं. जास्त कां तर हा प्रसंग माझ्या योगानें आला–त्याला मी कारण झालों.

**मित्र**—हें कोण खरं मानील! बाळासाहेब, त्यावेळच्या तुझ्या वर्तनावरून तर तुझ्या मनाची तशी स्थिति असेल असं कोणालाही वाटायचं नाहीं!

**बाळा०**—छे. छे. माझ्या बाहेरील हंसण्यावर व विनोदी बोलण्यावर तुमचा भलताच समज होऊं देऊं नका. वडिलांच्या तसबिरींस मान न दिला म्हणून त्यांच्या विषयीं मला पूज्यबुद्धि नाहीं असं होत नाहीं. मुर्तीची पूजा न केली म्हणजे देवावर भाव नाहीं हें म्हणणं जितकं खोटं आहे तितकंच तें खोटं आहे. असो! परंतु त्या तुमच्या धनाजीरावाची व त्याच्या क्षयरोगी बायकोची व त्यांच्या अन्नअन्न करीत असणाऱ्या मुलांची कहाणी ऐकल्यापासूस जें दुःख झालं तें त्याहून शतपट जास्त! असो! विसाजीपंत, या आठशें रुपयांतून चारशें धनाजीरावांना नेऊन द्या पाहूं—

**विसाजी०**—रावसाहेब—

**बाळा०**—कां–कमी होतील असं तुह्मांला वाटतं? आणखी शंभर घ्या—

**विसाजी०**—तसं नाहीं. बाळासाहेब, तुमचे दुसरे किती तरी कर्जदार आहेत–त्यांना–

**बाळा०**( रागानें ) काय ह्मणतां? शेंकडा चाळीस–पन्नास–त्याहूनही जास्त टक्के व्याजानें पैसे देणारांची तुंबडी भरण्यासाठीं गरीबांना भुकेनें व्याकूळ होऊं देऊं!

**विसाजी०**—रावसाहेब, पण हा न्याय कोणता? मागणारांना रडवून धर्म करायचा?

**बाळा०**-चला–चला न्यायवाले. अहो त्यांनीं दिलेल्या मुद्दलाच्या चौपट माझ्याकडून वसूल केले असतील. अशांना बोंबलत ठेवणं ही त्यांच्या गुणांप्रमाणें त्यांची योग्यच पूजा होय. चला-तुमच्या धनाजीरावांना पहिल्यानें हे पैसे नेऊन द्या व पुढें लालाजीनीं आणखी पैसे दिले म्हणजे जास्त काय द्यावयाचं तें पाहूं. चला मित्रांनों, आतां राहिलेल्या पैशानें थोडी चमन करूं या. वा! आज आमच्या वाडवडिलांनीं केवढा तरी हा आपल्यावर अनुग्रह केला! धन्य ते! ( जातात ).

---

# 'ढोंगी दुनिया'
अर्थात
# 'जें सारें चकाकतें तें सारें सोनें नव्हे'



( लेखक—रा. गणपतराव सोकरजी त्रिलोकेकर )

( मागील अंकावरून पुढें चालू. )

## अंक २ रा. प्रवेश ७ वा.

( आनंदीबाई पत्र वाचीत येतात. )

[ बाळासाहेब वाचीत बसले आहेत. ]

**आनंदी०**—या सुशीला बाईना मी काय बावगं सांगत होतें? चांगला योग्य नवरा पाहिला होता! झालं आतां! बाबासाहेब आतां लिहितात–अण्णाला मुनसफांची मुलगी सांगून आली आहे व तीच करण्याचा त्यांचा बहुतेक विचार नक्की झाला आहे.

**बाळा०**—मोठंच नुकसान झालं ह्मणायचं! अण्णा कोण आपले बंधु ना ?

**आनंदी०**—कां वरं ? त्याला काय नाक नाहीं ? कीं तो वेडा आहे ? त्याला काय झालं होतं ?

**बाळा०**—आईसाहेब ! माफी असावी. अण्णा तुमचा बंधु तेव्हां तुह्माला चांगलाच परंतु असा विचार करा, सुशीलेसारख्या शिकलेल्या सवरलेल्या उपवर मुलीला नवरा करायचा ! ती किती जरी मर्यादशील असली तरी असुक मुलगा बरा किंवा वाईट तिला समजत नाहीं काय ? व तसाच प्रसंग आल्यास आपले मनोगत स्पष्टपणें दाखविण्यास तिला हरकत आहे कीं काय ?

**आनंदी०**—पण आमच्या अण्णाला काय झालं होतं ? हिला असं काय लागून गेलं आहे ?

**बाळा०**—सुशीलेच्या योग्यतेविषयीं तुम्हांला सांगून उपयोग नाहीं. परंतु–त्या दिवशीं अण्णा जेवायास आला होता—त्यावेळीं त्यानें आपली हुषारी दाखविली खरी ! अरे ! अरे ! अशा वेडगळ मुलाशीं लग्न लावून सुशीलेच्या जन्माचें मातेरें करून टाकण्यांत तुम्हांला काय नफा झाला असता ?

**आनंदी०**—बाळासाहेब–तुम्ही काय म्हणतां याचा विचार केलात काय ? आमचा अण्णा वेडगळ ! व सुशीलेच्या जन्माचें नुकसान करण्यासाठीं म्हणून मी मुद्दाम हें नातें जुळवीत होतें–असं तुमचं म्हणणं कीं नाहीं ?

**बाळा०**—तुमचंच मन तुम्हांला साक्ष देत असेल. पण मला जें वाटलें तें मी स्पष्टपणें सांगितलें. तात्यासाहेबांच्या कानावर ही गोष्ट घालणार होतों, परंतु तुमच्या म्हणण्याप्रमाणें त्याची आतां जरूरच राहिली नाहीं.

(तात्यासाहेब येतात.)

**तात्या०**—(स्वगत)यापेक्षां दुसरं प्रमाण कोणतं पाहिजे ? एकमेकांशीं एकटीं कशीं अगदीं प्रेमानें गोष्टी करीत आहेत ! ( उघड ) काय गोष्टी चालल्या आहेत एवढ्या प्रेमानें ?

**बाळा०**—कोण तात्यासाहेब ! कांहीं नाहीं. गोष्टी कशाच्या ? सहज आपलं. पण बरं झालं—आपण भेटलांत. तात्यासाहेब, त्या बुवाच्या कीं महाराजांच्या नादीं लागलां आहां हें कांहीं चांगलं नाहीं.

**तात्या०**—काय म्हणतोस ? कोठचा बुवा ? मी नादीं लागलों आहें ?

**बाळा०**—शाबास ! गांवभर बातमी उठली आहे ! आपण व आईसाहेब–तो कोणी गांवांत बुवा आला आहे त्याच्या येथें जात असतां, त्याची सेवा चालविली आहे ! सगळी गोष्ट खोटी तर ?

**तात्या०**–मी कांहीं यांतलं समजत नाहीं ! ( आनंदीबाईस ) कायग–तुला कांहीं माहीत आहे काय ?

**आनंदी०**—(मनांत) आतां यांच्यापासून लपवून ठेवण्यांत हांशील काय आहे ! पुढेमागं सांगावं लागणारच. (उघड) हं–हं–हं ! शर्थ आहे बाई या रिकामटेंकड्या लोकांचा !

**तात्या०**—( रागानें ) लोक कांहींही म्हणोत ! पण तुझा काय या कामाशीं संबंध आहे ? हें काय प्रकरण आहे ?

**आनंदी०**—कशाचं प्रकरण नी कशाचं काय ! आले आहेत येथें कोणी साधु पुरुष;

गेलें होतें त्यांच्या दर्शनास ! त्यांत काय झालं ! बाळासाहेबांचा यांत विश्वास नसाव-याचाच ! त्यांना सगळ्याच गोष्टी खोट्या वाटतात !

**बाळा०**—तात्यासाहेब, त्या महाराजांसंबंधी मी कांहीं कमीजास्त बोलेन तर आई-साहेबांना तें रुचणार नाहीं. त्यांचा त्याच्यावर पूर्ण विश्वास बसला असावा. पण माझं इतकंच सांगणं आहे कीं अगदींच भोळेपणानं न वागणं हें बरं. जरा खबर-दारी ठेवावी हें ठीक ! या पुढें त्यांची व तुमची मर्जी ! या शहरांत ढोंगीसोंगी असे पुष्कळ बुवा येऊन गेले व येतातही.

**आनंदी०**—बरोबरच आहे ! लबाडास सगळे लबाडच दिसतात. त्याला खरा म्हणून कोणीच दिसत नाहीं ! अशा साधुपुरुषांविषयीं विनाकारण संशय घेणें यांत पाप आहे बरं !

**बाळा०**—ठीक, ठीक, माझं कर्तव्य मी केलं ! मी सावध केलं आहे. जागं रहाणं तुमचं काम आहे ! मी जातों—मला काम आहे. ( जातो. )

**आनंदी०**—मीही जातें. सांगेन मग सर्व तुह्माला.

**तात्या०**—अग पण, मला सांग तर खरी—थोडं तरी—

**आनंदी०**—आतां मला अगदीं वेळ नाहीं ! जाऊंद्या मला—( जाते. )

**तात्या०**—असं, असं, माझ्या येण्यामुळें त्यांना अडचण झाली. तेव्हां दुसऱ्या ठिकाणीं निघून गेलीं का ! वा ! वा ! ठीक युक्ती काढली ! अरे ! अरे ! माझ्याशीं बेपर्वाईनें वागलीस त्याची मला बिलकूल दरकार नाहीं. माझा पैसा पाण्यासारखा जरी खर्चलास तरी मला पतकरेल ! पण माझ्याशीं बेइमानी ! विश्वासघात ! अरे ! अरे ! हें मला कसं सहन होईल ! व यांचे हे नाच—माझ्या नजरेसमोर—माझ्यानें पहावतील तरी कसे ! अरे ! अरे ! हें माझें मस्तक कसं ठिकाणीं राहील ! हें सोसूं—कीं तें सोसूं—कीं काय म्हणून सोसूं ! एका चुकीचे हे सारे परिणाम ! घोर परिणाम ! देवा ! देवा ! ( जातात. )

---

## अंक २ रा–प्रवेश ८ वा.

### ( बाळासाहेबांची खोली. )

( बाळासाहेब व विसाजीपंत. )

**बाळा०**—विसाजीपंत, परवांचा तो प्रकार पाहून माझी तर खातरी झाली आहे कीं तो बुवा निवळ ढोंगी आहे. तात्यासाहेब व आई साहेब त्याच्या हातांत सांपडलीं असून तो त्यांनां केवळ नागवीत आहे. अशाचें ढोंग पहिल्यानेंच फोडलें पाहिजे.

**विसाजी**—पण बाळासाहेब आपणाला ह्या भानगडी पाहिजेत कशाला! आपण जगाचें कल्याण करण्यासाठीं कांहीं जन्म घेतला नाहीं.

**बाळा०**—हें काय म्हणतां विसाजीपंत तुम्ही! मला हें ढोंग आहे असं कळून आल्यावर माझ्यानें हा चाललेला प्रकार स्वस्थ बसून पहाववेल! तात्यासाहेब तर मला वडीला ठिकाणीं आहेत. पण परका कोणीं जरी असता व तो अशा ठकाच्या मोहजालांत सांपड लेला मी पाहिला असता तर पहिल्यानें त्याला सोडावण्यासाठीं मी धांव मारली असती. मी अशा ढोंगीं लोकांचा कट्टा वैरी आहें हें तुम्हांला या पूर्वींच माहीत असायला पाहिजे होतें.

**विसाजी०**—पण तुह्मींच ह्मणतांना कीं याबद्दल तात्यासाहेबांना इषारा दिला होता. परंतु तुमचं ह्मणणं त्यांनीं हांसण्यावर घालविलं?

**बाळा०**—अं हं–त्याची मी पर्वा बाळगीत नाहीं. ती सुरुवातीची गोष्ट. पण हल्लीं सुशी-लेच्या सांगण्याप्रमाणें–हें बंड बरंच माजलेलं दिसतं. बुवाच्या घरीं काय काय भेटी–पेढे बोलूं नका– बरफी बोलूं नका–फळफळावळ बोलूं नका– मणाचे मण जाताहेत. आज काय अष्टमीचे ब्राह्मण तात्यासाहेबांकडले–आज काय गुरुच्या तिथीचे ब्राह्मण. मारे चार आठ दिवसांनीं ब्राह्मणभोजन आपलें आहेच! शिवाय दर गुरुवारीं प्रसाद, पूजा, रोषनाई, हें तर ठेवलेंलच आहे.

**विसाजी०**—मी ऐकतों कीं बाईसाहेबांनीं नव्या तऱ्हेचे चार ग्यास लाईटचे दिवे सठास दिले. शंभर रुपयांच्या किंमतीचे!

नाहीं तर-वोहोत देखके थोडा गमाया ! असं व्हावयाचं. शिवाय एकदोन दिवस झाले, एथें एक दोन इसम मी पुष्कळदां खेपा घालितांना पाहिले. ते जरा संशययुक्त दिसले. मग खरं काय असेल तें असो!

**नारा०**–अं–तो उगीच तुमचा संशय–विनाकारण भीति. परंतु बोभाटा होण्यापूर्वी पोबारा करणं यांत शहाणपणा आहे. पण तो डल्ला लवकर हातीं येईल तर बरं.

**बुवा**–तें तुझ्या हुशारीवर अवलंबून आहे.

**नारा०**–व मीहि स्वस्थ बसलों नाहं. अष्टमीच्या देवीच्या उत्साहाकरितां दागिने असते तर किती शोभा आली असती, असं सहज मी म्हणालों. तों बाईसाहेबांनीं तावडतोब मी देतें माझे दागिने देवीच्या आंगावर घालण्यासाठीं असं म्हटलं. मी वरवर नको–कशाला–अशी आनाकानी केली. परंतु त्यांनीं जेव्हां फारच आग्रह केला तेव्हां–जर आपला आग्रहच आहे–तर मी आपल्या भक्ती आड कां येऊं असं म्हटलं.

**बुवा**—शावास ! युक्तिवाज खरा तूं !

**नारा०**—आपलाच प्रसाद हा! असो. ते दागिने घेऊन आज रात्रीं बाईसाहेब येणार आहेत. झालं कीं नाहीं काम फत्ते!

**बुवा**—तूं काम करणार तें कच्चं कसं रहाणार! ठीक तर येऊंद्या घेऊन. हातीं डल्ला पडला कीं रातोरात पोबारा !

**नारा०**—आतां भक्तमंडळी येण्याची वेळ झाली. चला बुवासाहेब—व्हावें आसनारूढ. *जयअंबे! जयअंबे!*

( बुवा आसनारूढ होतात. )

( भक्तमंडळी हळुहळू येऊं लागते. )

**नारा०**—कां रामभाऊ, विभूतीचा गुण आला ना? सांगितल्याप्रमाणें देतांना ?

**रामभाऊ**—देतो तर खरा. पण बुवांनां ह्मणावं कालरात्रीं पासून दुखण्यास जास्त जोर झाला आहे. दुसरी कांहीं विभूत द्याल तर बरें.

**बुवा**—छट् तिनेंच गुण येईल. जरा दुखण्यानें उलट खाल्ली ह्मणून काय झालं? येईल, लवकर गुण येईल. जगदंब समर्थ आहे!

**भक्तीण**—बुवासाहेब, आपण अंगारा दिलात तो आपण सांगितल्याप्रमाणें त्यांना खाण्या-

पिण्याच्या पदार्थांत घालून देतें. पण अलीकडे त्यांचा त्रास जास्त वाढत चालला आहे. दररोज मार खाऊन खाऊन जीव जेरीस आला! नाहीं आतां सोसवत.

नारा०—बाई तुम्हांला त्याच वेळीं महाराजांनीं सांगितलें कीं तुमचं काम कष्टसाध्य आहे. देवीची सेवा झाली पाहिजे व खर्चही करावा लागेल. तुम्ही खर्चाला भ्यालांत त्याला महाराज काय करतील !

भक्तीण०—आज आणले आहेत. पैसे जवळ नव्हते. दागिना सावकारापाशीं ठेवून आणले. कोठून तरी त्रास कमी होऊं द्या. मेला दररोज मार तो कसा खावा !

बुवा०—नारायणा ! बिचाऱ्या बाईनें जेमतेम पैसे आणले आहेत. पण काम होण्यासारखं असलं तर घे पैसे. नाहीं तर उगाच बाईला आशा लावून हांशील काय ? नारायणा या बाईसाठीं देवीस विचारलं होतं का ?

नारा०—होय. कळा लावला होता. परंतु जबाब चांगला आला नाहीं. म्हणून एवढा विलंब. पण होईल-काम होईल. [बाईस]

~~नारा~~०—पैसे किती आणिले आहेत ?

भक्तीण—पंचवीसच मिळाले. पन्नास नाहीं देण्याची शक्ति. एवढ्यानें नसेल होत तर जाऊं द्या. जीव तर जात नाहीं. नशिबीं असेल मार तो कोठून चुकतो !

बुवा—( ना. स. इषारा करितात. ) कांहीं चिंता नाहीं. बाई तेवढेच पुरवून घेऊं. तशीच जरूर पडल्यास नारायणा आपण मेहेनत करूं. काय करील बिचारी ! नाहींच पैसे तर आणील कोठून ! जगदंब-जगदंब-तूं समर्थ ! ( आनंदीबाई गजरीसह येतात. )

नारा०—या बाईसाहेब या-बसा-

बुवा—आशीर्वाद-आशीर्वाद-जगदंब कल्याण करील !

आनंदी०—महाराज आपण सांगितलेले दागिने घेऊन आलें आहें. तेवढे घेऊन ठेवा.

बुवा—घेऊं. घाई काय आहे. नारायणा देवीच्या उत्साहासाठीं बाईसाहेबांनीं भक्ती भावानें दागिने आणले आहेत ते मोजून घे व नीट चावी कुलपांत ठेव. हें लोकांचं जोखीम. तरी म्हणत होतों नको हें जोखीम-आम्हां सारख्या जवळ. पण तुमचा आग्रह पडलाना !

नारा०—हो खरंच आपणांसारख्या गरीबांजवळ असलं जोखीम नसलेलं बरं.

**आनंदी०**—कांहीं हरकत नाहीं. आपला मला पूर्ण विश्वास आहे ! माझे दागिने घरच्या पेटींत आहेत असें मी समजतें. शिवाय आपणांसारख्या साधुपुरुषांना सोन्याची ती मातबरी काय ?

**बुवा**—जगदंब समर्थ आहे ! खरं ह्मणालांत ! आह्मांला सोनं काय-नी हिरे काय-नी मोतीं काय—तुलसीपत्रासमान ! हीं केवळ तृणवत्. पण मानव प्राणी या सोन्या-साठीं महान घोर पातकं करण्यास प्रवृत्त होतात. या जगांत जेवढं ह्मणून पातक होत आहे त्याचं मूळ पाहूं गेलं तर कांचन व कांता. यांचा लोभ ज्यानें सोडिला—त्यानं जिंकलं—जगदंब ! जगदंब !

**नारा०**—सत्य आहे गुरुजी ! अक्षरशः सत्य आहे !

**आनंदी०**—गजरे आण पाहूं तो करंडा. ( इतक्यांत दोन चार पोलीसचे शिपाई व जमादार येतात. )

**जमादार**–( ना. स. ) राव–इकडे या पाहूं जरा.

**नारायण**–( घाबरून ) कोण ?–मी–मी–( ज० जवळ जातो. )

**जमादार**–हें बघ.खरं सांग. हा साधु खरा साधु आहे की ढोंगी ?

**नारायण**–( कांपत )–मी–मी–मला–काय माहीत ? इतर शिष्यांप्रमाणें मी एक—

**जमादार**–छः याला विचारून उपयोग नाहीं. याच्या मी–मी–नी फी-–फी च संपायची पंचाईत. पहात होतों बोभाट्याशिवाय काम उरकायला. ( बुवाजवळ जाऊन ) बुवाजी महाराज—

**बुवा०**–हं–हं–ही अशी लगट करण्याची रीत कोणती ? हें काय आहे ?

**जमादार**–थांब जरा. आतांच समजेल. बुवा महाराज या दाढी मिशा केव्हां वाढविल्यात ? ( हातानें ओढतो. त्या सुटून पडतात. ) अरे हा भामटा संभ्या–नगराहून पळून आलेला. तूंरे कां हें ढोंग माजविलें होतेंस ? तेथल्या गोरगरीबांस लुबाडून तृप्ति नाहीं झाली वाटतं ?

**बुवा**—छः छः मी संभ्या नाहीं. मी–मी—

**जमादार**—चूप. ( बिड्या घालून ) गडबड न करितां चला यांच्या बरोबर. नाहीं तर उगाच शोभा होईल येथें. ( शिपायांच्या स्वाधीन करतो . )

( बाळासाहेब व विसाजीपंत पुढें येतात. )

**बाळा०**—( आनंदीबाईस ) कां बाईसाहेब-शेवटीं मी म्हणत होतों तेंच अनुभवाला आलें ना ? त्यावेळीं खरं मानलं असतं तर !

**आनंदी०**—अगबाई ! कोण—बाळासाहेब ? तुम्ही पण इकडे ! मला बाई काय माहीत? मी विश्वासानें फसलें गेलें ! मला या ढोंग्याचें ढोंग काय माहीत ! अरे देवा ! याच्या पायीं मी किती तरी फसल्यें ! बुडलें अगदीं ! त्यांच्यासमोर मी आतां कोणच्या तोंडानें जाऊं ! त्यांचाही विश्वास मी बसविला. आतां त्यांना काय जबाब देऊं ? अरे मेल्या ढोंग्या ! काय काय मोठमोठ्या साधूपणाच्या व वेदांताच्या गोष्टी सांगत होतास ! त्या साऱ्या माझ्यासारख्या भोळ्या बायाबापड्यांना लुबाडण्यासाठींचना ! आग लागो तुझ्या त्या वाणीला व काळ्या तोंडाला ! ( बाळा. स ) आणि तुम्ही तरीही माझी फजिती पहाण्यास येथें कुठून आलेत ? आतां तुह्मांला कांहीं सांगायला नको ! सांपडलें. अगदीं हातीं सांपडलें ! अरे देवा देवा ! कायही विटंबना !

**बाळा०**—बाईसाहेब, अमळ शांत व्हा. भिऊं नका! मी जो येथें आलों तो तुमची विटं-बना पाहून आनंद मानून घेण्यास आलों नाहीं! मी तुमच्याच भल्यासाठीं आलों. पोलिसानें त्या लुच्या पाजी ढोंग्यास पकडलं नसतं तर मीच त्याचा भ्रमाचा भोपळा फोडणार होतों! पण हें झालं तें ठीकच झालं! तुमचं मोठं भाग्य समजा कीं वेळेवर हें ढोंग उघडकीस आलं ! नाहीं तर आपले बुवामहाराज हे तुमचे सगळे दागदागिने घेऊन रातोरात पोबारा करणार होते! आणि तसं जर झालं असतं तर? असो! या वरून कानाला खडा लावून घ्या! इतःपर अशा ढोंगी लोकांवर इतका बेसुमार भरंवसा ठेऊं नका! थोर नशीब तुमचं. नाहींतर फजिती तर फजिती होऊन आणखीं पदरास खार लागला असता तो निराळाच ! चला ! बुवामहाराजांचा हे लोक योग्य समाचार घेती-लच! चला विसाजीपंत, आतां येथें आपलें काम नाहीं!

( बाळासाहेब वगैरे मंडळी जाते. पोलीस झडती वगैरे घेऊं लागतात. )

## अंक दुसरा समाप्त.

# 'ढोंगी दुनिया'

## अर्थात

# 'जें सारें चकाकतें तें सारें सोनें नव्हे'



( लेखक–रा. गणपतराव सोकरजी त्रिलोकेकर )

( मागील अंकावरून पुढें चालू. )

## अंक ३ रा.

**स्थल**—नानासाहेबांची लायब्ररी रूम.

( नानासाहेब इझीचेअरवर बसले आहेत. )

**ना०**—( स्वगत ) स्त्रियांच्या स्वभावांत किती तरी वैचित्र्य आहे पहा ! काकीसाहेबांवर माझें प्रेम बसल्यापासून तें प्रेम मी किती तरी तऱ्हेनें प्रगट करण्याचे प्रयत्न केले ! पण त्यांनीं केवढा आव घातला ! जणूं काय पातिव्रत्याची केवळ मूर्तिमंत प्रतिमाच ! व त्यामुळें सुरवातींत मला वचक बसल्यासारखंही झालं ! व इतर रीतीनें किती जरी त्यांचा अल्लड स्वभाव असला तरी तात्यासाहेबांसंबंधानें त्यांचें इमान डगमगणं कठीण असें मला वाटूं लागलें. परंतु आतां तें सारं वरवरचं ढोंग होतं असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं ! व त्यांत मोठं नवल आहे असंही नाहीं ! अशा अल्लड स्त्रीशीं तात्यासाहेबांनीं विवाह करण्यांत घोड्याएवढी चूक केली ! त्यांत ह्मातारपणची तरुण बायको; मग काय विचारतां ! लगाम अगदींच ढिली सोडून दिल्यामुळें या परिणामास गोष्ट येऊन पोहोंचली ! आतां तात्यासाहेब आंवरू पाहाणार तें कसं जमतं ! तेव्हां दररोज तंटे नी भांडणें ! पण हा प्रकार माझ्या पथ्यावर पडणारसा वाटतो. तेंच पहा, परवांचा निकराचा तंटा झाल्यामुळें बाईसाहेबांचं मस्तक फिरून त्या माझा सल्ला घेण्याकरितां येण्यास तयार झाल्या. व त्या वेळेपासून माझ्या संबंधानंही त्यांचा विचार जरा बदलल्या सारखा दिसतो ! असो. असं वाटतं तर खरं ! पाहूं या. आतां माझा सल्ला घेण्यासाठीं बाईसाहेब येणार आहेत. येऊंद्या–सध्यां जोपर्यंत त्यांचं मन

क्षुब्ध आहे तोंपर्यंत आगींत तेल ओतून आपला हेतू साधावा यांतच शहाणपणा आहे. तंटा मिटल्यावर फार कठीण जाईल. ( बाहेरून आवाज ऐकून ) आल्या वाटतं— ( गीतेचें पुस्तक वाचूं लागतात. आनंदीबाई येतात. ) शिवहरे ! शिवहरे ! ( पुस्तक बंद करून ) या—मोठीं माणसं या—

**आनंदी०**—नानासाहेब तुह्मांला फार वेळ खोळंबत राहवं लागलं.पण माझा उपाय नव्हता. मी काय करूं ! ते येऊं देतील तेव्हांना ! अलीकडे नजरेआड कशी ती बिलकूल होऊं देत नाहींत.

**नाना०**—( हसून ) त्यांत तें काय मोठं नवल झालं ! राग येऊं देऊं नका. परंतु खरो-खर हा मुखचंद्रमा आपणां समोर नेहमीं असावा असं कोणास वाटणार नाहीं ? असा अरसिक कोण आहे ? हरी तूं समर्थ ! हरी तूं समर्थ !

**आनंदी**—बरं-बरं तुमचा वात्रटपणा राहूंद्या—तुह्मांला बऱ्या थट्टा मस्कऱ्या सुचतात ! ह्मणतातना, " उंदराचा जातो जीव आणि मांजर गाते ओंव्या ! " नानासाहेब खरोखर सांगतें त्यांचा स्वभाव दिवसें दिवस ज्यास्त तिरसट होत चालला आहे—अगदीं दुःसह झाला आहे ! त्यांत त्यांना अलीकडे माझ्या संबंधानें आपल्या बाळासाहेबांचा संशय आला आहे. याला हंसावं कीं रडावं !

**नाना०**—शिव हरे ! शिव हरे ! काय म्हणतां ? बाळासाहेबाचा संशय ? काकीसाहेब हीं म्हातारीं माणसं काय बोलतील नी काय करतील याचा मुळींच नेम नाहीं ! शिव हरे ! शिवहरे !

**आनंदी**—आणि त्यांत त्यांना कोणी दुष्टानें विनांवी पत्र पाठवून त्यांत माझी फार नालस्त केली आहे. त्यावेळेपासून तर त्यांनीं माझा निवळ छळ चालविला आहे. खरंच सांगतें मी म्हणून हें समळं सहन करतें. दुसरी कोणी असती तर तिनें केव्हां एका घावानें दोन तुकडे करून टाकले असते. पति झाले म्हणून काय झालें ?

**नाना०**—हो, मी पण तेंच म्हणत होतों ! पति झाले म्हणून काय झालं ? विनाकारण बायकोचा छळ करायचा ! जुलूम—निवळ जुलूम. शिवहरे ! शिवहरे !

**आनंदी०**—मी खरोखर सांगतें—नवरा दुसऱ्या कितीही रीतीनें द्वाड असला तरी पत-करेल—परंतु वेहेमी नवरा—अग बाई—बाई—

**नाना०**—हरी तूं समर्थ ! हें तुमचं म्हणणं अक्षरशः खरं आहे ! संशयी नवरा वाईटच आणि त्यांत म्हातारा संशयी नवरा–( हंसून ) माफी असावी बेअवदी बद्दल–शिव हरे ! शिवहरे !

**आनंदी०**—हेच एकटे का म्हातारे आहेत ? दुसऱ्यांचे म्हातारे नवरे नाहींत का ?

**नाना०**—पण त्यांच्या बायका तुमच्या सारख्या नसतील !

**आनंदी०**—( रागानें ) म्हणजे ! मला असं काय झालं आहे ? मी असं तर काय करतं ?

**नाना०**—हें पहा ! उगाच रागावूं नका. तसा कांहीं माझ्या म्हणण्याचा इरादा नव्हता. मी म्हणतों या कामांत मला तुमचाच वांक दिसतो. हो बुवा खरं आहे तें स्पष्ट बोलण्यास भीति कशाची ! शिव हरे ! शिव हरे !

**आनंदी०**—माझा वांक ? तो कसा ?

**नाना०**—हें पहा. तुम्ही विचारतां म्हणून सांगतों. पण नको. तुम्हांला तें खरं वाटणार नाहीं. व रुचणारही नाहीं. शिवहरे ! शिवहरे !

**आनंदी०**—असं अर्धवट् बोलून थांबतां कां ? वांक असल्यास माझ्या पदरांत घाला.

**नाना०**—तुमचा आग्रहच आहे तर सांगतों. हें बघा काकीसाहेब आपण नानासाहेबांना फाजील फूस देतां. त्यांना तुम्ही अगदीं डोकीवर बसविलें आहे. ते तुम्हांला कोठें ठेवूं कोठें नि ठेवूं असे झाले आहेत. व म्हणूनच जरा कोठें कमी जास्त झालं कीं त्यांना रुचत नाहीं. प्रत्येक गोष्टीला मर्यादा असते. पुष्कळ जोडपीं असतील पण तुमच्या सारखें कोठें नसेल. प्रभो तूं समर्थ ! शिव – हरे ! शिव हरे !

**आनंदी०**—मला या तुमच्या बोलण्याचा बिलकूल अर्थ समजत नाहीं. मी त्यांना फूस देतें ? वाहवा ! उलट त्यांचं मला टोंचून बोलणं असतं कीं मी त्यांच्याशीं अगदीं बेपर्वाईनें वागतें व माझें त्यांच्यावर बिलकुल प्रेमही नाहीं.

**नाना०**—आणि अशा नवऱ्यावर बायकोनें प्रेम ठेवावें कसं ? म्हणतातना–' मर्कटस्य किं नररत्नहारः ', जो नवरा आपल्या सदाचरणी बायकोचा विनाकारण संशय घेऊन तिला छळतो, तो तिच्या प्रेमास अगदीं पात्र नाहीं. बिलकूल पात्र नाहीं ! शिवहरे ! शिवहरे !

**आनंदी**—( आश्चर्यानें ) म्हणजे तुमचं म्हणणं असं कीं मी त्यांच्यावर बिलकूल प्रेम ठेवूं नये ?

**नाना०** — अलबत नाहीं. इतकेंच नव्हे तर मी आणखी असंही ह्मणतों कीं अशा नवऱ्यास शिकविण्यासाठीं व शुद्धीवर आणण्यासाठीं–बायकोनें–ह्मणतातनां–'वाघ बोललं तरी खातो–वाघोबा बोललं तरी खातो'–त्याप्रमाणें—

**आनंदी०**–पुरे पुरे ! तुमचं ह्मणणं असंच कीं नाहीं कीं नवरा बायकोचा संशय घेऊं लागला तर बायकोनें अशा संशयाला कारण मिळेल असंच वर्तन ठेवावं ! असं ह्मणाना–त्याच्या समोर दुसऱ्याचा हात धरून जावं ! वाहवा ! हा चांगला उपदेश ! मी ह्मणतें त्यांचा हा संशय विनाकारण आहे अशी त्यांची खात्री करण्याचा उलट तिनें प्रयत्न करावा.

**नाना०**—शिवहरे ! शिवहरे ! हें पहा. हें असं बोलणं फार सोपं आहे पण करणं मात्र कठीण–फारच कठीण–आणखी संशय खरा असो अगर खोटा असो, हें संशयाचें पिशाच्च असं कांहीं विचित्र आहे कीं एकदां का त्याचं वारं आलं कीं मग पाहिजे तें करा—वाटतील ते प्रयत्न करा–तें अजीबाद म्हणून नाहींसं व्हायचंच नाहीं व नवरा बायकोचीं मनें एकमेकांविषयीं कधींही शुद्ध रहावयाचीं नाहींत. तात्यासाहेबांचा स्वभाव आधींच तापट—त्यांत त्यांनां या संशयानें घेरल्यामुळें "आधींच मर्कट तशांतही मद्य प्याला" अशांतली ती गोष्ट झाली आहे ! ते तुम्हांला एक घटकाभरही सुखी राहूं देणार नाहींत. तर अशा त्रासांत रहाण्यांत काय अर्थ ? मला नवल वाटतं कीं हा सर्व जाच तुम्हीं सोसतां तरी कसा ?

**आनंदी०**—( संतापानें ) जाच सोसवेना म्हणूनच तुमच्याकडे आलेंना ! तुम्हीं एखादा चांगला उपाय सुचवाल अथवा एखादा बरा मार्ग दाखवाल अशी मोठी आशा होती पण तुम्हीं तर उलट आगींत तेल ओतलं ! व भलभलतं करण्यास सांगतां ! रोगापेक्षां उपाय भयंकर !

**नाना०**—हरी तूं समर्थ ! हरी तूं समर्थ ! हं हं ! असा विनाकारण जिवाला संताप कां करून घेतां ? भिऊं नका. मला ही तुमची स्थिति पाहवेना म्हणून मी इतक्या कळकळीनें बोललों. काय सांगूं, काकीसाहेब माझ्यानें आतां बोलल्याशिवाय रहाववत नाहीं–तो हरी साक्ष आहे ! मी पुष्कळ आवरूं पहातों–परंतु प्रेम हें–( आनंदीबाईचा हात धरावयास जातात )

**आनंदी०**–( घाबरून ) हं-हं-हें काय म्हणता !–( इतक्यांत तात्या साहेब बाहेरून हांक मारितात )—

अरे ! अरे ! त्यांचा हा आवाज ! मी खोलींत नाहीं असं पाहून ते इकडे येत असावेत. अगबाई-मी आतां कसं करूं ! आधींच त्यांच्या मनांत माझेविषयीं संशय ! त्यांत अशा वेळीं एकांतांत यांच्या बरोबर मला पाहिल्यास मग काय ! माझीं पुरीं शंभर वर्षेच भरलीं ! अरे-अरे ! मी हा केवढा अविचार केला तरी ! नानासाहेब ! मी आतां काय करूं ! सांगा तरी ! असे स्तब्ध कां ?-बोला. पण थांबा-या पडद्याआड लपूं? आतां विचार करायला वेळ नाहीं. ते आतां आंत येतील-लपतेंच मी-त्यांना समजूं देऊं नका बरं-मी लपतेंच-पहाबरं-नाहीं तर विश्वास घात कराल. ( पडद्या आड लपतात. तात्यासाहेब आंत येतात. नानासाहेब गीतेचें पुस्तक उघडून वाचीत बसतात. )

**तात्या०**—वाहवा ! जेव्हां पहावं तेव्हां गीतेचें पुस्तक हातांत ! एवढ्याशा वयांत अशी वृत्ति आणि आमचं एवढंही वय होऊन त्याचा गंध नाहीं ! शाबास ! नाना साहेब शाबास !

**नाना०**शिवहरे ! शिवहरे ! कोण ? तात्या साहेब ? या-( गीता वाचूं लागतात. )

**तात्या०**नानासाहेब, तिला इथं कोठें पाहिली का ?

**नाना०**—( वाचीत असतांनांच ) वाहवा ! तात्यासाहेब ! काय मौज आहे तरी ! ऐका-श्रीकृष्ण अर्जुनास म्हणतात. ' तस्मात्त्वमिन्द्रियां–( गीतेतून वाचतात. ) खरोखर तात्यासाहेब या पुस्तकाची योग्यता किती तरी सांगावी ! तात्यासाहेब ! तुम्हीं हा ग्रंथ वाचाच ! खरंच सांगतों. या जगांत हाच एक तरणोपाय आहे ! तुमच्या जवळ नसल्यास ही प्रत मी तुम्हांस देतों.

**तात्या०**—नको. माझ्याजवळ आहे. परंतु नानासाहेब मला बोलल्याशिवाय रहावयत नाहीं ! तुझा हा उद्योग फारच स्तुत्य आहे ! व तुझं एकंदरीनें वर्तन पाहून मला अति आनंद होतो. व काकासाहेबांनीं तुम्हां दोघांना अगदीं लहानपणापासून माझ्या स्वाधीन केल्यामुळें तुम्हांसंबंधानें जी जबाबदारी माझ्यावर होती तींतून अंशतःतरी मी मोकळा झालों हें पाहून माझ्या मनास मोठं समाधान वाटलं—

नाना०—ही हरीची कृपा ! व माझ्या संबंधानें आपण जे म्हटलंत—ही आपली लायकी ! एवढंच ! मी एक क्षुल्लक पामर इतक्या स्तुतीस कांहीं पात्र नाहीं ! हरी तूं समर्थ !

तात्या०—परंतु नानासाहेब तुझ्या त्या बाळासाहेबासंबंधानें मी फार कष्टी आहें ! छट् तो हातांत धरण्या सारखा नाहीं.

नाना०—हरीची इच्छा ! तात्यासाहेब या गोष्टी आपल्या हातांतल्या आहेत का ? मुलं वगैरे बरीं वाईट निघणं हें केवळ पूर्व कर्माचं फळ आहे. म्हणतातना "पूर्वदत्तेषु या भार्या"–परंतु तात्यासाहेब बाळासाहेबांविषयीं आपण इतके उदासीनतेचे उद्गार काढलेत तर तुमच्या विचाराप्रमाणें तो इतका का द्वाड आहे ? माझं मन तर मला तसं सांगत नाहीं. कांहीं गैर समजूत तर नसेलना ? शिवहरे ! शिवहरे !

तात्या०—छी: छी: अगदींच कामांतून गेला. मला त्याचा एकही गुण पसंत नाहीं. तुला तसं नाहींच वाटणार. कारण एकतर पाठचा भाऊ व आणखी भल्यास सर्व भलेच वाटणार ! नाना साहेब मला तर नवल वाटतं-बाळासाहेब तुझी नेहमी निंदा व नालस्त करीत असतां तूं तर त्याच्याविषयीं बरंच बोलतोस !

नाना०—हरी तूं समर्थ! हं-हं-करोत, ज्यांनां योग्य वाटेल ते निंदा करोत!आपलं त्यांत कांहीं कमी होत नाहीं. या सध्यांच्या तरुण पोरांची धर्मावर श्रद्धा मुळींच नसते. तेव्हां कोणी धर्मावर विशेष श्रद्धा दाखवूं लागला ह्मणजे उगाच त्याची टवाळकी करायची. त्यांतलाच हा एक प्रकार. परंतु आह्मीं अशांकडे लक्षच देत नाहीं. अशांची परवा आह्मीं बाळगीत नाहीं. आह्मीं ह्मणतात ना—" कोणी वंदोत कोणी निंदोत "—

तात्या०—नानासाहेब, आपण येथें अगदीं एकटे आहोंतना ?

नाना०—( चपापून ) अरे देवा ! यांना कांहीं सुगावा लागला काय ? तसें असल्यास पुरी फजिती ! ( उघड. तात्यासाहेब, असं कां बरं विचारतां ? या वेळीं येथें दुसरं कोण असणार ? हरी तूं समर्थ !

तात्या०—तसं नव्हेरे. माझा स्वभाव तुला माहित आहेच. अति भित्रा.

नाना०—हरी तूं लज्जा रक्षण करणार समर्थ आहेस ! तात्यासाहेब बेअदबी माफ असावी—व अंमळ संशयी पण खरा—खरंच कीं नाहीं !

**तात्या०**—असेल. असेल. पण तें राहूंदे. मला तुझ्याजवळ एक अगदीं जिवाकाळजाची गोष्ट सांगायची आहे. व त्यासाठीं मुद्दाम मी या निवांत वेळीं आलों आहें.

**नाना०**—( मनांत ) अरेरे ! ही काय पीडा ! इकडे आड तिकडे विहीर अशी स्थिति ! तिकडे बाईसाहेब बसलेल्या ! व बहुतकरून त्यांच्याच संबंधीं कांहीं कागाळी सांगण्यास ही स्वारी आली असावी ! ही मोठी पंचाईतच झाली ह्मणायची ! पण आतां करायचं काय ? पाहूं तर या काय बाहेर पडतं तें. मग त्याप्रमाणें पुढली व्यवस्था. ( उघड ) तात्यासाहेब, खुशाल मोकळ्या मनानें काय सांगायचं असेल तें सांगा. तिसऱ्या कानास जावयाचं नाहीं ही खात्री असूंद्या. प्रभो ! सुबुद्धि देणार तूं समर्थ आहेस !

**तात्या०** —हें पहा नाना, तुला माहित आहेच कीं या माझ्या ह्मातारपणांत मी एक मोठी विवंचना पाठीस लावून घेतली आहे.

**नाना०**—( स्वगत ) अरे ! अरे ! हें त्यांनीं ऐकलं तर ! ( उघड ) बरं मग ?

**तात्या०**—परंतु झाली गोष्ट आतां परत येत नाहीं. पण मी तर अगदीं जेरीस आलों इच्या पायीं ! काय सांगूं तुला ! अरे एक कीं दोन ! सगळंच सांगूं लागलों तर एक महाभारतच होईल. छांदिष्ट ! मानी ! हट्टी ! अविचारी ! हाताचीही उधळी ! पैसा केवळ पाण्यासारखा खर्चते ! पोषाख कपडे वरचेवर नवे ! अशाला कितीही पैसा असला तरी कसा पुरणार ! कुबेराचें धनही पुरं होणार नाहीं. बरं तें असो ! घटकाभर हें सगळं पुरवेल ! पण हें बघ नानासाहेब--अलीकडे तिचं माझ्यावरील प्रेमही बरंच कमी झालेलं दिसतं.

**नाना०** —छट्. तात्यासाहेब हा तुमचा समज अगदींच खोटा आहे. त्यांच्या विषयीं संशय तुह्मांला व्यर्थ येत आहे बरं! परमेश्वर तुमचा संशय दूर करो !

**तात्या०**—असं खरं असल्यास माझ्यासारखा सुखी या त्रिभुवनांत दुसरा कोणी मिळणार नाहीं. पण काय सांगूं ? हा केवळ संशय नाहीं. माझी खातरी होऊन चुकली आहे ! ही बेइमान झाली ! माझा विश्वासघात केला ! केंसानें गळा कापला ! अरे अरे ! मी काय करूं ! माझ्या अंगाचा तिळपापड होतो आहे ! कोठें मी या वयांत या भानगडींत पडलों !

**नाना०**—हं ! हं ! तात्यासाहेब. इतका कां आपल्या जिवाला त्रास करून घेतां । मी

ह्मणतों तें खरं माना.—आईसाहेब किती उधळ्या कां असतनां–त्यांना कपडेलत्याचा कितीही शोख कां असेना–त्यांचा स्वभाव किती ही तिखट कां असेना–पण–तुमच्याशीं बेईमान–विश्वासघात–कध्धींही नाहीं ! शिव हरे ! शिव हरे !

**तात्या०**—अरे हातच्या कांकणाला आरसा कशाला ! ज्या चोरानें–भामटयानें–माझ्या संसारसुखांत माती घातली–ज्यानं माझं घर फोडलं–तोही–सांपडला–

**नाना०**—काय म्हणतां–तात्यासाहेब–

**तात्या०**—व तोही घरांतलाच चोर - घरांतला !

**नाना०**—( घाबरून ) खरंच कीं काय ? पण तात्यासाहेब–मी खरंच सांगतों–शपथ घेऊन सांगतों– ( स्वताशीं ) अरे मी असं वेड्यासारखें काय करीतं आहे– ( उघड ) नाहीं ! छट् कध्धींही होणार नाहीं ! असा अधम कोण ? हे प्रभो !

**तात्या०**—( संशयानं ) कां नानासाहेब ! असं कां करतोस ? असा घाबरलास कां ? तुला देखील कांहीं संशय येतो का ?

**नाना०**—छट्. कांहीं नाहीं ! पण ही तुमची सगळी हकीकत ऐकून मला कसंसंच वाटूं लागलं–व–

**तात्या०**—असेल–असेल–जाऊं दे तें. पण हें पहा नानासाहेब, तो चोर कोण असावा–तुला वाटतं ?

**नाना०**—सांगून तरी टाका त्याचं नांव–उगाच संशयांत कां ठेवितां–

**तात्या०**—तुझा पराक्रमी धाकटाभाऊ बाळासाहेब ! अरे ! अरे ! सापास दूध किंरे पाजलं !

**नाना०**—काय म्हणतां ? आपला बाळासाहेब ! देवा हें मी काय ऐकतों ! हरी ! हरी ! तूं समर्थ । छट् छट् तात्यासाहेब आपला बाळासाहेब ! ( हंसून ) छः हो. कोणी तरी दुस्मनानं आपले कान भरले आहेत ! असं कध्धींच होणार नाहीं । हरी ! हरी !

**तात्या०**—नाहींरे नाहीं ! तिचं प्रेमही माझ्यावरून दिवसं दिवस कमी होत चाललं आहे. परंतु बाळासाहेब असा कृतघ्न होईल व माझ्या संसारसुखांत माती कालवील असं माझ्या स्वप्नांतही नव्हतं–

**नाना०**---हरी तुझी लीला अगाध आहे ! मी पण तेंच म्हणतों. तात्यासाहेब ! या रीतीनें भरंवसा कोणाचाच ठेवतां येत नाहीं असं झालं कीं नाहीं ! अरे ! अरे ! प्रभो !

पण तात्यासाहेब एकपक्षीं तसं असल्यास यांत कांहीं नवल वाटण्यासारखं नाहीं बाळासाहेबाला संगत कोणाची लागली आहे बरं ! चैन मौजमजा याखेरीज दुसरा कांहीं उद्योग आहे का ? धर्मविषयीं तिळमात्रही पूज्यबुद्धि आहे का ? झालं–मग अशा रिकामटेंकड्यांनां असेच विचार सुचावयाचे–हर ! हर ! प्रभो ! सर्व प्राणीमात्रांना सुबुद्धि देणार तूं समर्थ आहेस !

**तात्या०**—पण नानासाहेब। तुझं खरं मत सांग. तुला काय वाटतं–तिची चाल तशी असेल का ? कीं उगीच दोरीला साप समजून मी माझ्या जिवाला त्रास करून घेत आहे ?

**नाना०**—हें बघा तात्यासाहेब मी पहिल्यानेंच तुम्हांला सांगितलं कीं बाहेरचा देखावा कसाही असो बाईसाहेबाचं वर्तन अगदीं निष्कलंक आहे अशी माझी तर खातरी आहे.

**तात्या०**—तूं म्हणतोस तसं खरं असो किंवा खोटं असो माझी अशी स्थिति आहे कीं मला इकडेही बोलवत नाहीं तिकडेही बोलवत नाहीं. म्हातारपणीं तरुण बायकोशीं लग्न करणं हा एक मूर्खपणा करून आतां चारचौघांत बजबजाट करणं ह्मणजे त्यांत माझीच फजिती ! जन त्रिविध आहे ! तेव्हां आतां स्वस्थ बसून आंतल्याआंतच पश्चात्ताप करीत असावं. दुसरं काय ? यांतच शहाणपणा आहे. खरोखर--माझ्या अविचाराचं फळ मलाच भोगलं पाहिजे. लोकांना मजा दाखवून स्वतांचं हंसं करून घेण्यांत काय अर्थ ? पण मला त्यांतल्यात्यांत दुःख हें वाटतें कीं–ज्याला मी पोटच्या मुलासारखा मानून लहानाचा मोठा केला–जो माझ्या एका जिवलग मित्राचा मुलगा--त्यानें मला असा दगा दिला ! अरे–रे–

**नाना०**—शिव हरे! शिव हरे! तात्यासाहेब, पुन्हां तेंचनितेंच मनांत आणून तुमचं मन कां दुखवितां ! असल्या पाजीपणाचें फळ त्याला लवकरच मिळेल. ! परंतु आतां पुढें काय करायचं याचा विचार केला पाहिजे नाहीं बरें ?

**तात्या०**--असाच कांहीं विचार करून मी तुझ्याकडे आलों. माझं मन मला सांगतें कीं तिची माझ्यावर प्रीति आहे. माझी तर तिच्यावर आहेच. आतां तिच्या व माझ्या वयामध्यें पुष्कळ अंतर आहे ही गोष्ट मी विसरलों नाहीं. व त्यामुळं जसी समवयस्क जोडप्यामध्यें प्रीति असावी तशी आमच्यांत असणं संभवनीय नाहीं. तेंही मी पक्केपणं जाणतों–व त्यावद्दल मी तिला

तिळमात्रही दोष देत नाहीं ! याचा विचार मी पूर्वीच करायला पाहिजे होता ! आतां त्याबद्दल तक्रार करणं मला शोभणार नाहीं. पुन्हां हें बघ जसजसा मी म्हातारा होत जाणार तसतशी ही ज्यास्त ज्वानींत येणार ! तिला कपड्यालत्त्याची, दाग दागिन्यांची आधींच हौस आहे. चार चौघांत जाणं येणं याचीपण तिला फार आवड. हें सर्व तिनें खुशाल करावं. मी तिला त्याबद्दल एक शब्दही बोलणार नाहीं. तिच्या सर्व हौशी मी पुरवीन. मात्र तिनें माझ्याशीं बेइमानानें वागू नये. नानासाहेब– मी म्हातारा झालों आहे. आतां मी किती वर्षे आणखीं राहणार ? आजपर्यंत देवाच्या कृपेनं अब्रूमध्यें दिवस घालविले. आणि आतां या म्हातारपणांत अब्रूचे कांकडे झालेले मला पाहवतील काय? देवा ! देवा ! त्यापेक्षां डोळे मिटतील तर बरं. तिला म्हणावं तूं खुशाल हवा तसा खर्च कर–कांहीं हरकत नाहीं–पाहिजे तसे कपडे वापर. लागतील चाहेल ते दागिने कर ! मी त्याकडेही दुर्लक्ष्य करीन ! फार काय सांगूं ! दर महिन्याला फक्त तिच्या खर्चासाठीं म्हणून मी तिला चांगलीशी रक्कम देत जाईन.व माझ्या पाठीमागं माझ्या साऱ्या मिळकतीची मालकीण करीन ! नानासाहेब खरंच सांग-या पेक्षां मी जास्त काय करूं ?

**नाना०**—शाबास ! तात्यासाहेब शाबास ! तात्यासाहेब–खरोखर या पेक्षांजास्त काय केलं पाहिजे ? तुमच्या हयातींत पाहिजे तसं खावं प्यावं मौज करावी. व नंतर सगळ्या इस्टेटीची मालकीण. मग आणखीं काय पाहिजे ! हरी तुझी लीला अगाध आहे !

**तात्या०**—आणखीं हें मी खरोखर म्हणतों याचा पुरावा हीं बघ दोन खतं. आजच वकीलाकडून तयार होऊन आलीं. एकांत तिला दरमहा रु. १०० स्वतंत्र खर्चासाठीं दिले आहेत व दुसऱ्यांत माझ्यानंतर तिला माझ्या सगळ्या मिळकतीची मालकीण केली आहे. व तीं तुझ्याकडे दाखविण्यासाठीं घेऊन आलों होतों–

**नाना०**—खरंच कीं काय ! शाबास ! तात्या साहेब. आपल्या औदार्याची खरोखर कमाल आहे ! आजच्या काळांत इतका भोळेपणा इतरांत क्वचित् आढळेल ! ( मनांत ) असे भोळे असतात म्हणूनच तर आमच्या सारख्यांचं साधतं ! हरी तूं समर्थ !

**तात्या०**—पण नानासाहेब ! खरोखरच तुझी खात्री आहेना कीं तिचं प्रेम माझ्यावर कायम आहे ? निदान बाळासाहेबासंबंधी संशय खोटा ना ? सांग–खरें असेल तें सांग.

( इतक्यांत बाळासाहेब बाहेरून हांक मारतो. )

**बाळा०**—( बाहेरून ) नानासाहेब—नानासाहेब—

**तात्या०**—कोण हाक मारतोय बरं ? बाळासाहेब तर नाहीं ? तोच ! या वेळीं काय काम आहे त्याचं ?

**नाना०**—काम कशाचं ! आला असेल कोठून बाहेरून—जातां जातां उगीच चाहटळ-पणा करायचा—दुसरं काय ?

**बाळा०**—( बाहेरून ) कां नानासाहेब—गीतेचा पाठ चाललाय कां ? तसं असल्यास आह्मीं गच्छंति करितों.

**तात्या०**—हें बघ नानासाहेब—तूं बाळासाहेबाला आंत येऊं दे. मात्र मी येथं आहें असं त्याला सांगू नको. मला एक युक्ति सुचली आहे.

**नाना०**—ती कशी काय ?

**तात्या०**—हें पहा. मी येथें कोठें तरी लपून रहातों. तूं बाळासाहेबाबद्दल खातरी देतोस ना ? ठीक तर. तूं तिच्याबद्दल त्याच्याजवळ गोष्ट काढ ! व मला त्याच्याविषयीं संशय आहे हेंही त्याला कळीव. मग पाहूं या तो काय जबाब देतो तो.

**नाना०**—( मनांत ) अरेचा. हें काय नवीन लचांड ! यांतून भलतंच कांहीं उद्भवलं तर कसं ? परंतु उपाय काय ? यांच्या मनांत भरलं कीं मग ते कोणाचं ऐकणार आहे तका ! ( उघड ) बरं तर—पण तुह्मी लपणार कोठें ?

**तात्या०**—अं त्यांत काय मोठें आहे ! हा इकडे पडदा आहेना ? त्याच्या पाठीमागें जातों. ( जाऊं लागतात. पडद्यापर्यंत गेले न गेले तों नानासाहेब त्यांस बळेंच परत फिरवितात. ) पण नानासाहेब त्या पडद्याआड दुसरं कोणी आहेसें वाटतं ! मला बांग-ड्या वाजल्यासारखा भास झाला. कोणी आहेका तिकडे ? (पडद्याकडे जाऊं लागतात.)

**नाना०**—(घाबरून ) छट् छट् तिकडे कोण असणार ! कोण नाहीं हो ! ( मनांत ) असं सांगितल्यानं हा म्हातारा ऐकणार नाहीं. पडद्या पाठीमागें जाऊन पाहील ! सबब येथें कांहीं उलट सुलट समजवलें पाहिजे; ( उघड हंसत हंसत ) हं-हं-हं-काय गंमत सांगू तात्यासाहेब—बिचारी तुमच्याकडून लपून रहाण्यास पहात होती, परंतु तुह्मींच तिला पकडली ! हं ! हं ! हं ! हरी तूं लज्जा रक्षण करणार समर्थ आहेस !

**तात्या०**—पण ती आहे तरी कोण ?

**नाना०**—ती का ? ती आपली धोबीण.

**तात्या०**—कोण ? धोबीण ! आणि एवढ्या प्रहरीं ! आणखी येथें एकटी-व लपून-हें गौडबंगाल मला कांहीं समजत नाहीं ! नानासाहेब तूं पण तसाच कीं काय ? बाळा-साहेबावरही कडी ! नानासाहेब हें काय आहे ? माझ्याशीं थट्टा करणं सोडून दे व सांग पाहूं.

**नाना०**—हं हं हं ! जरा थंड व्हा. सर्व कांहीं सांगतों. आपल्या जुन्या धोबिणीला तुह्मी हांकून लावलीत ना ? कपडे जाळून टाकल्याबद्दल ?

**तात्या०**—बरें मग ?

**नाना०**--तर ती तुह्मांकडे रदबदली करण्यास मला सांगण्याकरितां येऊन केव्हांची बसली होती. मला आज घरीं येण्यास रात्र बरीच झाली. पुढें जेवण वगैरे झाल्यावर तिचें रडगाणें ऐकत होतों. इतक्यांत तुह्मी आलांत. तुह्मी येतां हें समजतांच बिचारी घाबरून गेली व मी नको नको सांगत असतां-तुह्मीं जाईपर्यंत येथेंच लपून रहातें असं ह्मणून तेथें पडद्याच्या पाठीमागें राहिली ! बस्स ! झालं. आतां झाली तुमची खातरी ? हरी तूं समर्थ !

**तात्या०**—असेल ! पण तूं असा शहाणा--अब्रूदार-अशा वेळीं एकांतांत धोबीण झाली ह्मणून काय झालं- परक्या आणि तशांत ज्वान परस्त्रीला--लपूं देणें-लोक काय ह्मणतील-बरें तें असो ? तिला तेथेंच राहूं दे ! मला त्या खोलींत लपूं दे ! चल ! नाहीं तर बाळासाहेब आंत येईल. तो पहा पुन्हां गडबड करायला लागला. ( तात्यासाहेब आंत जातात. खोलीचें दार लावून घेतात. )

**बाळा०**—( बाहेरून ) कां नानासाहेब अजून गीतेचा पाठ पुरा नाहीं का झाला ?

**नाना०**—परमेश्वरा ! लज्जा रक्षण करणार तूं समर्थ आहेस ! मला हीं सर्व चिन्हं ठीक दिसत नाहींत ! यांतून काय निघेल आणि काय नाहीं हें सांगवत नाहीं ! असो ! आतां दुसरा उपाय नाहीं ! प्रभो ! तूं समर्थ ! ( दरवाजा उघडण्यास जातो )-

( इतक्यांत-- )

**आनंदी०**—( पडद्याआडून ) नानासाहेब-नानासाहेब-आतां मी जाऊंका ?

**नाना०**—( घाबरून ) अं, अं. ( हातानं खूण करून ) तिकडेच घटकाभर असा-

तात्या०—( दरवाजा जरा उघडून ) नानासाहेब ! काम कच्चं राहूं देऊं नको बरं-खूप खोदून खोदून विचार बरं !

नाना०—( दरवाजा बंद करून ) तात्यासाहेब ! हें असं काय करतां ? माझं कांहीं जात नाहीं. अशानें तुमचंच काम बिनसेल. तुम्हीं आंत स्वस्थ बसा व मौज काय होते ती पहातर खरी–( मनांत ) आतां सगळी मौजच मौज ! हे परमेश्वर !

आनंदी०—( आंतून ) नानासाहेब ! मला निसटून जाण्याला ही संधी बरी आहे. मी जातें तोंपर्यंत दरवाजा धरून ठेवा.

नाना०—छट् छट् भलतंच नाहींतर. तुम्हीं घाबरूं नका–

तात्या०—( आंतून ) नानासाहेब–ती आली आहे का ? तिच्या आवाजा सारखा आवाज ऐकल्याचा भास झाला.

नाना०—अहो तो भासच खरा ! त्या एवढे प्रहरीं इकडे कशाला येतील ! हें बघा तुम्हाला लवकर परत जाणें असेलतर बसा पाहूं स्वस्थ. मी बाळासाहेबाला आंत घेतों. ( आनंदीस ) पाहिलंत ना ? कान किती तिखट आहेत ते ! हरी तूं समर्थ !

( दरवाजा उघडून बाळासाहेबास आंत घेतो. )

बाळा०—कां नानासाहेब–योगसाधन चालविलं होतं वाटतं ?

नाना०—हें पहा तुझी थट्टा राहूंदे एकीकडे–काय म्हणतोस तूं ?

बाळा०—हो हो ! आज मिजाज गरम कां बरं ? आपणांसारख्यांना राग–संताप--या तामसीगुणांचा बिलकुल गंध नसला पाहिजे ! बरं तें असो ! तात्यासाहेब इकडे आले होते का ?

नाना०—छट् नाहीं. पण हो बरी आठवण झाली–बाळा मी बरेच दिवस झाले, तुला सांगण्यास पहात होतों. पण तुझी भेट केव्हां होते व तुला फुरसद कोठें आहे ? स्वस्थपणे दोन गोष्टी बोलाव्या तर फुरसद कोठं आहे ? तुझी जेव्हां पहावं तेव्हां धांदल व उतावीळ ! बाळा हें तूं मांडलं आहेस काय ? अरे ज्यानें आपणांस लहानाचे मोठे केले–जे आपणांस केवळ बापासमान–त्यांच्याशीं असलं कृतघ्नपणांचं व पाजीपणांचं वर्तन ! हरी ! हरी ! याचा देवापाशीं काय जबाब देणार ?

बाळा०—म्हणजे ? हें तूं म्हणतो आहेस तरी काय ?

**नाना०**—त्या बिचाऱ्या तात्यासाहेबांनीं असा तुझा कोणता अपराध केला कीं त्यांचं मन दुखविणं ह्मणजे तुला कांहींच वाटत नाहीं ? हं ?

**बाळा०**—हें पहा नानासाहेब–मी जरी उधळेपणा करतों–पाण्यासारखा पैसा खर्चितों–मौज मजा करतों–तरी पण इतकें लक्षांत ठेव कीं मी तात्यासाहेबांना कधींही तसदी दिली नाहीं–माझं मीच संभाळून घेतों.

**नाना०**—अरे पैशाची गोष्ट कसली घेऊन बसला आहेस ? असं वेड काय पांघरतोस ? सांगूच का उघड अगदीं ? तुला वाटतं लोकांना डोळे नाहींत--कान नाहींत–त्या आईसाहेबा बरोबर नाच घालतोस ते दुसऱ्यांनां दिसत नाहींत का ? छी: छी: केवढं हें अघोर पातकी कर्म ! हर ! हर । प्रभो ! शिव हरे ! शिव हरे !

**बाळा०**—[ मोठ्यानें हंसून ] हा ! हा ! हा ! आतां ध्यानांत आलं–अरे अरे हें वेड त्या बिचाऱ्याच्या मनांत कोणी भरवून दिलं ! हं. हं. याला हसावं कीं रडावं ! शेवटीं ह्मातारपणीं तरुण बायको केल्याचा फायदा दिसूं लागला तर त्यांनां ! हं हं ! काय ह्मणतोस ? आईसाहेबांबरोबर मी नाच घालतों ह्मणतोस ? हा: हा: हा:

**नाना०**—असा गाढवासारखा हंसतोस काय ? ही हंसावयासारखी गोष्ट आहे का ? तात्यासाहेबांच्या मनांची काय स्थिति झाली असेल याचा तुला तिळमात्र तरी विचार आहे का ? अरे ! अरे ! परमेश्वराची तरी भीति बाळग ! परमेश्वराची ! तुला वाटत असेल कीं तुला कोणी पहात नाहीं, पण तो सर्वसाक्षी परमेश्वर, त्याची नजर सर्वत्र व सर्वांवर आहे ! बरं असे चाळे करायचे ते तरी कोणाशीं ? व त्यामुळं विश्वासघात कोणाचा करायचा ? बापासमान व केवळ देवमाणूस अशाचा ! हे प्रभो !

**बाळा०**—-हें पहा नाना साहेब इतका वेळ मी आपलं सहज ऐकून घेत होतों- पण तूं तर फारच चऱ्हाट लावलंस. आतां या बाबतींत तुला जास्त पाल्हाळ करूं देणं म्हणजे पाप आहे ! हें पहा ! तात्यासाहेबांच्या मनांत हा कोणी व्यर्थ वहीम घातला आहे. व तो वहीम दूर करण्याऐवजी तूं त्याला पुष्टीकरण देत आहेस. असो. माझ्यावर तात्या साहेबांचा संशय आहे त्या बद्दल मला इतकं वाईट वाटत नाहीं. पण मला त्यांची केवळ किंव येते. बिचाऱ्यांनीं करूं नये परंतु म्हातारपणीं लग्न केलं. त्यांत त्यांनीं आईसाहेबासारख्या बायकोशीं लग्न केल्यामुळें त्यांना फार त्रास भोगावा लागत

आहे. आई साहेबांचा स्वभाव अति द्वाड. त्यांचें घटकाभर कसं तें जुळत नाहीं. नेह मीं तंटे नी भाडणं. तें आपण नजरेनें पहातोंच. परंतु त्याला आतां उपाय नाहीं. कमीं जास्त प्रमाणानें हें असंच जन्मभर चालणार. परंतु हें नवीन प्रकरण मात्र भयंकर आहे. यामुळें तात्यासाहेबांच्या संसारसुखाचा शेवट झालाच असं म्हटलं पाहिजे. हा वहीम सुरवातींतच काढून टाकला तरच कांहीं उपयोग. परमेश्वर साक्ष आहे ! आईसाहेबांविषयीं वाईट विचार माझ्या स्वप्नांतही कधीं आलेला नाहीं. हर ! हर ! त्या मला आईच्या ठिकाणीं. त्यांच्याशीं मी नाच घालणार ! पुन्हां आईसाहेबही तशा तल्या नाहींत अशी माझी पूर्ण खातरी आहे. तसी बायको सहज ओळखतां येते. हं हं म्हणतां–

**नाना०**––हें ऐकून तात्यासाहेबांनां अति आनंद होईल.

**बाळा०**—पण नानासाहेब, माझ्याविषयीं त्यांच्या मनांत हा कोणी उद्योगी माणसानें संशय घातला असावा बरं ? त्या पेक्षां तुझ्या विषयीं घातला असता–

**नाना०**—हं. हं. हें काय म्हणतोस ? भलतंच कोठचं !

**बाळा०**—भलतं बिलतं मी कांहीं जाणत नाहीं. मी कसाही असो माझ्यांत एक मोठा अवगुण आहे व तो हा कीं मला सोंगाढोंगाचा मोठा तिटकारा आहे. मला जें कांहीं वाटतं तें मी स्पष्टपणें बोलायला मागंपुढं पहाणारा नाहीं. मी आज पुष्कळ दिवस पहातों कीं या ध्यानधर्माच्या पांघरुणाखालीं तुझं अशा गोष्टींत बरंच फावतं--व तुझा सहसा कोणास संशयही येत नाहीं. तें कशाला, परवां आपण नाटकाला गेलों होतों तेथें आईसाहेबांच्या बरोबर किती तरी चाहटळपणा चालविला होतास ? व आईसाहेबांनीं तुला त्याबद्दल कितीतरी छेडलें !

**नाना०**—भलतंच नाहीं तर--मी चाहटळपणा मांडला होता ?

**बाळा०**––पुन्हां त्या दिवशीं मी गच्चीवर रात्रीं सहज आलों तों तेथें तूं आईसाहेबांना–

**नाना०**––( मनांत ) अरे, अरे, हा सर्व घोटाळा करणार असं वाटतं ! तात्यासाहेबांनीं हें सर्व ऐकलें असल्यास माझी काय अब्रू राहिली ? याचं तोंड बंद करण्यास कांहीं युक्ति केली पाहिजे. ( उघड ) बाळासाहेब ही मस्करी करण्याची रीत नव्हे.

**बाळा०**—मस्करी कशाची–माझी खातरी आहे कीं त्यांना जरी पसंत नाहीं तरी आई साहेबांच्या विषयीं तुझ्या मनांत पापवासना–

**नाना**—हं ! हं ! ( बाळा. स एकीकडे नेऊन ) बाळासाहेब, अरे गप्प बस. अरे वेड्या तात्यासाहेब हें सगळं ऐकत आहेत. ते येथें लपून बसले आहेत.

**बाळा०**—( आश्चर्यानें ) कोण तात्यासाहेब ? खरंच की काय ? वाहवा ! तरीच मला वाटत होतं कीं ते येथेंच आले ह्मणून. बरें, ते कोठें असे लपले आहेत ?

**नाना०**—त्या दरवाजाच्या पाठीं--तुझ्यासंबंधीं त्यांचा संशय काढून टाकण्यासाठीं ह्मणून मी ही युक्ति योजली. बरी होती कीं नाहीं युक्ति ?

**बाळा०**—असं. असं. माझ्याच कल्याणासाठीं ! (उपहा) बरोबर आहे ! आपण जगाचं कल्याण इच्छिणारे तेव्हां प्रत्यक्ष भावावर विनाकारण कोणी संशय घेऊं लागला तर तो तुम्हांला कसा सहन होणार ! याबद्दल मला आपले उपकार मानले पाहिजेत ! बरं पण तात्या साहेबांना या बंदिवासांत आणखीं किती वेळ ठेवणार ? मुक्त करूंया. ( मोठ्यानें ) तात्यासाहेब--तात्यासाहेब--यावं--बाहेर यावं--[ तात्यासाहेब बाहेर येतात. ]

**नाना०**—कां मी सांगितल्याप्रमाणें झालं ना ? आतां झाली आपली खातरी ?

**तात्या०**—हो ! मी जें कांहीं ऐकलं त्या वरून माझी खातरी झाली--बाळासाहेब--तुझा-सी विनाकारण वहीम घेतला याबद्दल मला वाईट वाटतं--व तूं जें बोललास त्या वरून तिच्या विषयींही माझ्या मनांतील भलभलते विचार नाहींसे झाले. काय सांगू माझ्या छातीवरील एक जबरदस्त दगड उचलून टाकलास--

( इतक्यांत नानासाहेबास बाहेरून कोणी हांक मारतो. )

**नाना०**—अरेचा ! हा कोठं एवढे प्रहरीं आला ? याला बाहेरच्या बाहेर वाटेस लावला पाहिजे. पण यांना इकडे असेच ठेऊन मी जाऊं कसा ? माझ्या पाठीमागं हा इकडे काय करील नी काय नाहीं ! पण गेल्या शिवाय उपाय नाहीं. ( तात्या०स. ) हें पहा तात्या साहेब, खालीं माझा मित्र आला आहे त्याला जरा भेटून येतों. पण हें पहा बाळासाहे-बा जवळ त्या धोबीणीविषयीं कांहीं बोलूं नका बरं--नाहींतर उगाच माझ्याबद्दल नाहीं नाहीं ते कुतर्क काढून वात्रटपणा करील ! ( बाळा.स ) हें बघ बाळासाहेब, मी जाऊन येईपर्यंत तात्यासाहेबापाशीं गप्पागोष्टी मारीत बैस--

**तात्या० व बाळा०**—तूं जा--आमच्या विषयीं कांहीं काळजी नको करूं. खुशाल जा.

( नाना०जातो. )

**तात्या०**--बाळासाहेब-आज पुष्कळ दिवसांनीं हा योग घडून आला. नाहीं तर तूं एकटा कोठें गांठणार ! मला तुला पुष्कळ सांगायचं आहे. पण संधीच सांपडत नाहीं. हें पहा, हा तुझा वर्तनक्रम तुला-तुझ्या अब्रूदार कुटुंबाला शोभतो काय ? असो. अज्ञानपणांत झालं तें झालं पण यापुढें तरी सुधारशील ? पुष्कळ झालं. पण सग-ळ्याला मर्यादा आहे. तोच नानासाहेब पहा ! चार दिवस त्याच्या संगतींत रहा, त्या-च्या सल्ल्यानें वाग. कसं त्याचं वर्तन--धर्म-नेम-स्नानसंध्या याशिवाय त्याला दुसरा उद्योगच नाहीं !

**बाळा०**—अररर. आपल्याला बुवा तें कसं पतकरणार ! मला कांहीं दाढी मिशा वाढवून ऋषि व्हावयाचं नाहीं. तें कशाला तो स्वर्गास जाईल. आणि आह्मीं नरकास जाऊं. एवढंच ना ? अं-तें पुढचं आहे. सध्यां तर चैन मारून घ्यावी. हें पहा-चोरी-चहाडी-लबाडी-विश्वासघात याबद्दल खबरदारी ठेवली ह्मणजे झालं. वरकड सगळें ढोंग-झूट—

**तात्या०**—तूं तर अगदीं निःसंग झालास ! तुझ्या बऱ्यासाठीं ह्मणून सांगतों. पुढं तुझी मर्जी—( स्वताशीं ) याला त्या धोबीणीची गोष्ट सांगूं कां ? जरा गम्मत उडेल ! पण नको ! त्या बिचाऱ्याला हा नाहक छळील ! पण बाळासाहेब ह्मणतो त्याप्रमाणं कदा-चित् खरा प्रकार तर नसेलना ? नानासाहेबाचं हें सगळं वरवरचं ढोंग तर नसेलना ? व खरा आंतला रंग निराळाच. पण छट् तसं असल्यास तें केव्हांच बाहेर पडलं असतं. असं ढोंग कितपत टिकणार ! पण हें धोबीणीचं प्रकरण प्रथमदर्शनीं जरा संशययुक्त दिसतं खरं ! धोबीणही अंमळ देखणी आहे-ज्वानही आहे ! खरा प्रकार काय असेल याबद्दल मति अगदीं चालत नाहीं ! पण जरा गमतीदाखल आग पेटवून तर द्यावी ! कांहीं नाहीं तरी त्यांतून खरा प्रकारतर बाहेर पडेल ! सांगूं तर-सागतोंच—( बाळा. स. ) बाळासाहेब-बाळासाहेब-इकडे पहा-तुला एकं गंमत सांगूं ?

**बाळा०**—काय आहे ? काय आहे ? गमतीची गोष्ट असल्यास मला पहिल्यानं सांगा. धर्मांबिर्मांविषयीं असली तर ती आमच्या बंधुराजास—

**तात्या०**—हें बघ येथें दुसरं कोण लपलं आहे तुला वाटतं ? मी एकटाच लपलों होतों का ?

**बाळा०**--नाहींतर ? आईसाहेब पण होत्या कीं काय ? जोडप्यानें लपलां होतां वाटतं ? वाहवा ! वाहवा !

**तात्या०**—सगळ्याच कामांत तुझा चाहटळपणा ! मीरे जोडप्यानें लपूं कशाला ? हें बघ- आपली धोबीण माहीत आहेना ?

**बाळा०**—कोण ? चंद्री ?

**तात्या०**—तीच. तिला कीं नाहीं तुझ्या बंधुराजानें लपवून ठेविली आहे. आहे कीं नाहीं गंमत ?

**बाळा०**—छट् छट् उगाच थट्टा करतां तुम्ही.

**तात्या०**—अरे थट्टा नाहीं नी मस्करीही नाहीं. मी तिच्या बांगड्यांचा आवाजही ऐकला- याउपरांत तुला खोटं वाटत असेल तर पडद्यापाठीमागें पहा.

**बाळा०**—वाहवाहरे ! आमच्या बंधुराजानीं हा बरा धंदा मांडला आहे ! पाहूं या तर खरी–कोठं ती धोबीण लपवून ठेविली आहेती ! या पडद्या पाठीमागें का ? ( पडदा लाथ मारून पाडतो–पाठीमागें उभ्या असलेल्या आनंदीबाई दृष्टीस पडतात– )

**बाळा०**—अरे—ही कोण आईसाहेब ! शाबास–

**तात्या०**—कोण ? तूं ? तूंग इकडे कोठें ? आणि ती चंद्री कोठें गेली ?

( इतक्यांत नानासाहेब बाहेरून धांवत येतो व हा प्रकार पाहून स्तब्ध उभा रहातो. )

**बाळा०**—तात्यासाहेब ! नानासाहेबाची धोबीण पाहिलीत का ? आईसाहेब धोबीणीच्या जागीं आपण कशा आलांत तें सांगाल काय ? शब्द नाहीं ! तोंड बंद. ( नाना.स ) बरं बंधुराज ! धोबीणीस लपविली असतां तिच्या जागीं आईसाहेब कशा आल्या याचा खुलासा देऊं शकाल काय ? छः तुझंही तोंड बंद ! तात्यासाहेब आपण तरी कांहीं खुलासा द्याल काय ? छः सर्वांचींच तोंडं बंद ! ठीक ! ठीक ! जरी मला या गौडबंगालाचा उलगडा करितां येत नाहीं तरी तुम्हीं आपापसांत सर्व प्रकार समजलां असालच ! नसल्यास एकमेकांकडून समजून घ्यालच–आतां येथें माझं काम नाहीं– तात्यासाहेब तुम्हीं येथें आहांत–बाईसाहेबही आहेत–व बंधुमहाराजही आहेत.– तेव्हां एकमेकांची खातरी करालच ! पण जातां जातांना तात्यासाहेब–तो नानासाहेब पहा ! चार दिवस त्याच्या संगतींत राहिल्यानं खचीत सुधरशील–या तुमच्या उपदेशाची आठवण होते. हा ! हा ! हा ! सुधरेन खरा ! आणि बंधुमहाराज आपल्याही उपदेशाची मला आठवण होते. जो आपणांस बापासमान त्याच्याशीं असं कृतघ्नपणाचं वर्तन–हर ! हर ! प्रभो ! हा उपदेश यावेळीं आपणच घ्या बरं ! हा ! हा ! हा ! ( जातो. ).

**नाना०**—तात्यासाहेब–प–प–परमेश्वराचं नां–नांव घेऊन–स–स–सांगतों कीं जरी तु–तु–तुम्हांला स–ससंशय आला–तरी प–प–पण–

**तात्या०**—( रागानें ) असं प–प–प–त–त–त–काय करतोस ? बोल सांग–खरा प्रकार काय आहे तो--

**नाना०**--जरा धी-धीर ध-राल तर सर्व कांहीं सांगतों–हें पाहां तुमची आई–अरे चुकलों–माझी–आईसाहेब–अरे चुकलों–आपली आईसाहेब–आपल्या सुशीले संबंधानें दोन गोष्टी सांगण्याकरितां मजकडे आल्या होत्या–येऊन पांच मिनिटेंही झालीं नसतील इतक्यांत तुम्हीही आलांत. आपण येतां हें समजतांक्षणीं बाईसाहेब घाबरून गेल्या व तुम्हांस न कळतां बाहेर पडण्यास दुसरा मार्ग नसल्यामुळें त्या येथेंच लपून राहिल्या. पुढील प्रकार तुम्हांला माहीत आहेच. माझं म्हणणं खरं वाटत नसल्यास आईसाहेबांनाच विचारा–

**आनंदी०**—( पुढें येऊन ) अगदीं खोटं–एकून एक गोष्ट खोटी !

**नाना०**—( स्वगत ) अररर ! यांनीं माझा गळा कापला ! ( आनंदी०स ) हें काय तुम्हीं करतां ? यावेळीं मी सर्वस्वी तुमच्या हातांत आहें–माझी अब्रू रक्षण करणं केवळ तुमच्या स्वाधीन आहे.

**आनंदी०**—( रागानें ) साधु महाराज जरा चुप बसाल ! मला यांना खरा प्रकार सांगूं द्या. मी यांच्या गोड गोड शब्दांवर भुलून व मागलापुढला कांहीं विचार न करितां येथें आलें–कशाला आलें व कां आलें हें माझंच मला माहीत नव्हतं. आपल्या त्या दिवसाच्या तंटयामुळें माझं मन तुमच्यावर अति रागावलं होतं. व त्या रागाच्या झपाटयांत–ब्ऱ्या वाईटाचं भान नाहींसं होऊन यांचा सल्ला घेण्यास आलें–खरं पाहिलं असतां आजपर्यंत यांनीं मधून मधून जें कांहीं स्वरूप प्रगट केलं होतं त्यावरून मी शहाणी व्हावयाचं होतं–परंतु त्यांच्या देवदेव करण्यामुळं व बाहेरच्या दांभिकपणा मुळं माझ्या लक्षांत इतकं आलं नाहीं. यांच्या मनांत माझ्याविषयीं बरेच दिवस पापबुद्धि असावी–आपणांमध्यें वारंवार तंटे होत व तुमच्यावर माझं मन त्यादिवसाच्या भांडणापासून अति रागावलं आहे– यांचा लाभ घेऊन यांनीं मला फुसलावून येथें आणली व आज त्यांनीं अगदीं स्पष्टपणें आपलं खरं स्वरूप प्रगट केलं–व मला फितुर करण्याचा प्रयत्न चालविला होता. पण त्यांत त्यांनां यशप्राप्ति झाली नाहीं.

तात्या०—कां–नानासाहेब–ही म्हणत्ये तें खरं आहे का ?

आनंदी—ते काय जबाब देणार ! त्यांना जबाव देण्याला तोंड कोठं आहे–ऐका मींच सगळं सांगतें--आज माझे डोळे साफ उघडले ! आजपर्यंत केवळ नादान बुद्धीनें माझ्याकडून आपला वेळोंवेळीं उपमर्द झाला–यांत संशय नाही–व गी येथें नाहीं असं समजून माझ्या संबंधानं आपण जे विचार प्रगट केलेत--माझ्या कल्याणाची जी इच्छा दर्शविलीत–त्यामुळें मला माझ्या आजपर्यंतच्या वर्तनाचा पूर्ण पश्चात्ताप झाला आहे. मी आपणां बरोबर अशा रीतीनं वागत असतांनांही माझ्या सुखासाठीं तुम्हांला इतकी कळकळ.-हर ! हर ! मला आज पावेतों तुमची खरी परीक्षा झालीच नाहीं–असो--इतक्यांत काय झालं–यापुढें माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत तुम्हांला काडीएवढं दुःख न होईल अशा रीतीनं मी माझं वर्तन ठेवीन. आतां या वेषधारी साधुपणाचा आव घालणाऱ्या त्या धर्मठकासंबंधानं मी इतकंच म्हणतं कीं यांनीं आजपर्यंत आपण जे त्याच्या वर उपकार केले ते साफ विसरून कृतघ्नपणाचा व आपमतलबीपणाचा कळस करून तुम्हांला या तुमच्या म्हातारपणीं सर्व प्रकारें त्रास व अब्रूहानि होईल अशा प्रकारें वर्तन ठेवण्यास मला सल्ला देण्याचा पाजीपणा केला. परंतु माझ्या सुदैवानं व देवाच्या दयेनं वेळेवरच याचं ढोंग बाहेर पडलं ! अशा ढोंग्याचं तोंड पहाणं यांत पाप आहे !

तात्या०—शाबास ! शाबास ! शाबास !

नाना०--तात्यासाहेब--आईसाहेब रागाच्या झपाट्यांत कांहीं तरी बोलून गेल्या. त्या सर्व साक्षी परमेश्वराची शपथ-

तात्या०—चूप ! मूर्खा ! देवाच्या पवित्र नांवाचा तुझ्या पापी वाणीनें उच्चार करतोस कशाला ? देवधर्माच्या सोंगढोंगानें आम्हां सर्वांस फसवून आणखीं साधुत्वाचा मोठा आव घालतोस ? ( आनंदी०स ) चल, आजच्या ह्या प्रकारानें या ढोंगी साधूचं ढोंग फुटलं तर खरंच पण त्यापासून एक मोठा फायदा झाला. तो हा कीं, तुझ्या संबंधानें माझा संशय पार--पार फिटला ! आज माझ्यासारखा सुखी प्राणी ईशकृपेनें दुसरा कोठेंही मिळणार नाहीं ! प्रभो तुझी इच्छा बलवत्तर ! चला–पुढील बंदोबस्त होईल पुढें ! ( जातात ).

नाना०—झाली ! सर्व बाजूनें फजिती झाली ! प्रभो तुझी इच्छा खरी ! हरी तूं समर्थ !

( पडदा. )

- अंक ३ रा समाप्त.

# ' ढोंगी दुनिया '

अर्थात्

# ' जें सारें चकाकतें तें सोनें नव्हे '



( लेखक—रा. गणपतराव सोकरजी त्रिलोकेकर. )

( मागील अंकावरून पुढें चालू. )

## अंक ४ था. प्रवेश १ ला.

स्थल—अन्नपूर्णाबाईचें घर.

[ मंगळागौरीच्या पूजेचा थाट. बायकांची गडबड. ]

( राधाबाई. रमाबाई. उमाबाई इ० स्त्रिया. )

**अन्नपूर्णा०**—सखू—अग सखू—बघ बरं कुणी हळदीकुंकु घेतल्यावांचून जाईल. मी अंमळ तिथं राधाबाईशीं बोलत बसतें. आल्यागेल्याचा समाचार घे बरं.

**सखू०**—आई. खुशाल बैसतूं. मी आणि यमू नी गोदू आहोंत इथं. साऱ्यांचा समाचार घेऊं.

**अन्न०**--कांहो राधाबाई, रमाकाकू, उमाबाई, जानकीबाई अजून कुठं आल्या नाहींत त्या ? जवळच्या ह्मणून साऱ्यांच्या पाठीमागनं वाटतं ?

**राधा०**—तसं नव्हं. आज गांवांत पुष्कळ ठिकाणचं बलावणं आहे. तेव्हां दुसऱ्या सर्व ठिकाणीं जाऊन शेवटीं इथं येतीलसं वाटतं. मग स्वस्थपणें दोन घटका गोष्टी बोलत बसायला हरकत नाहीं.

**अन्न०**तसं असल्यास फारच चांगलं. नाहीं तरी मी कुठं त्यानां लवकर जाऊं दिलं असतं. त्याच आल्या वाटतं. ( रमाबाई, उमाबाई, जानकीबाई इ० येतात. ) वाहवा ! परवां म्हणत होताताना कीं सर्वांच्या अगोदर येऊन बसेन म्हणून; सखूच्या मंगळागौरीच्या पूजेच्या वगैरे कामांत मदत करणार होताताना ? अशीच का मदत करणार होतात ती ?

**रमा०**–यमीला पाठविलीना आधीं ?

**अन्न०**-यमू कांहीं तुमच्या तर्फेनें नाहींहो आली. ती सखूची मैत्रीण म्हणून आली.

**रमा०**–बरं बाई तसं कां होईना. आह्मांला उशीर झाला खरा. पण काय करावं ! पहिल्यानं या उमाबाईनंच उशीर केला. कांहीं केल्या त्यांचा बाळ्या त्यांना सोडीना. शेवटीं जेमतेम समजावून गोपाळरावांच्या स्वाधीन करून निघाल्या एकदांच्या. तिथनं गोपिका बाईच्या इथं मंगळागौरी आहेत तिथं गेलों. तिथं उभ्या उभ्यानेंच भेटून निरोप घेतला. वाटेवर गोविंदराव वकीलाच्या इथलं पण साधलं. मनांत म्हटलं इथं वेळ उशीर झाला तर अन्नपूर्णा आपलीच आहे–करूं तिची कशी बशी समजूत.

**अन्न०**–बरं बाई–आल्यात हा मोठा उपकार झाला.

**जानकी०**–त्यांत हो उपकार कशाचा ? अहो हें उसनं वाण आहे. आम्ही तुमचे कडे तर तुम्ही आमचे कडे.

**अन्न०**–बसा तरी बाई. अशा परक्या कां ? अग यमू-सखूग कुठं गेली ? तिला सांग इथं हळदीकुंकुं द्यायला. सांगितल्याखेरीज कांहीं समजायचं नाहीं. आंगचं शहाणपण सध्यांच्या मुलींत फारच बाई कमी ! त्यांचा बाहेरचा दिमाख मात्र पाहून घ्यावा.

**उमा०**-खरंच बाई. ती आमची कुशी. घोडी झाली पण इवलीशी तरी हुशारी तिच्या आंगीं आहे ? यांच्या वयाला आपलीं लगनं पण होऊन गेलीं होतीं नाहीं का ?

**जानकी०**–कां हुशारी नाहीं ? घरकामाला आळस. पण चांगले इषकीचे कपडे घालून इकडे तिकडे रिकामटेकड्या फिरायला सांगा म्हणजे बघा त्यांची चलाखी नी चटपट ! कशा चालतील लवतील नी कशा बघतील इकडे नि तिकडे !

उमा०—खरंच. आणखी या मोठ्या पोरींना शाळेंत जातांयेतांना पहा ! कशा मुडडतात नि नटतात !

राधा०—खरंच बाई. ती आमची गंगू. घरीं कोणाशीं बोलायची नाहीं नी चालायची नाहीं. चारदां विचाराल तेव्हां कुठं एकदां जवाब देईल. पण तीच गंगू शाळेंत गेली म्हणजे वेगळीच मुलगी. म्हणे कशी फडाफड बुकं कीं फुकं वाचते. श्लोक नी गाणीं अशीं कांहीं म्हणते कीं शाळेंतले सगळे मास्तर तिची वाहवा करितात !

जानकी०—हो बाई ! आताशां आपल्या लोकांनीं ताळच बाई सोडला ! मोठमोठाल्या आया शोभतील अशा पोरींना गाणीं काय शिकवतात आणखी आहा ! वाहवा ! करीत त्यांच्या तोंडाकडे टकटक पहात काय रहातात ! छीः बाई ! मास्तर झाले म्हणून काय झालं ! किती झाले तरी पुरुषच ते ! त्यांचा अशा पोरींशीं जितका कमी संबंध राहील तितका बरा ! या मोठाल्या पोरींना शिकवायला मास्तरणीच हव्या आहेत ! पुरुष उपयोगाचे नाहींत !

उमा०-अग हो. पण कां हो वाराणशी, मग ती बाळासाहेबांबरोबर खरीचका पळून गेली ?

रमा०—कोण हो उमाबाई ?

उमा०—दुसरी कोण ? वाड्यांतली आनंदीबाई.

जानकी०—अहो बाळासाहेबाबरोबर नव्हे नाना साहेबाबरोबर.

वाराणशी०—बाळासाहेबाबरोबरही नाहीं आणि नानासाहेबांबरोबर ही नाहीं. त्या ढोंगी बुवाच्या बरोबर. घरांतले दागदागिने घेऊन आगगाडीच्या डब्यांतही जाऊन बसल्या होत्या; पण वेळेवर पोलीसानें त्या बुवाला पकडलं, म्हणून सगळा बेत फसला !

रमा०—अखेर तो बुवा ढोंगी ठरलाना ! मी पूर्वीपासूनच म्हणत होतें. पण आपल्या बायका किती उल्लु. त्या अशा थोतांडें करणाऱ्याच्या नादीं लागतील. पीराथडग्यांना नवस करतील पण तुळशीला प्रदक्षणा घालणार नाहींत. (सावित्री बाई येतात.) या सावित्री बाई, आल्या. यांना विचारलं म्हणजे सगळं कांहीं कळेल.

उमा० जा० वा० इ०—हो हो ! यांनांच विचारूं या.

उमा०-सांगा हो खरंच सांगा. कोणाबरोबर पळून जाणार होत्या?

वारा०—बाळासाहेबाबरोबर ना ?

**मान०**–नानासाहेबाबरोबर ना ?

**राधा०**–बुवाबरोबर ना ?

**सावित्री०**–बाई-बाई-किती तरी ही धांदल ! हें आहे तरी काय ? मला बाई गांगरून टाकूं नका ! कोण पळणार होतं ?

**राधा०** अहो तुमच्या यजमानीण बाई–दुसऱ्या कोण ?

**सावित्री०**–असं. असं. पण मला पहिल्यानं हें कळूं द्या कीं तुम्हांला दुसरा विषयच नाहीं का ? आणखी मला हें पण समजत नाहीं कीं त्या बिच्याऱ्या कुटुंबानें तुमचा असा कोणता अपराध केला आहे कीं, त्यांच्या चिंध्या फाडण्यांत तुम्हांला इतका आनंद वाटतो ! नाहीं नाहीं त्या खोट्या नाट्या बातम्या उठवून निंदा करण्यांत आनंद मानणें यांत तुम्हांला भूषण तें काय वाटतं ! जगांत तात्यासाहेबांनींच का उतारवयांत लग्न केलं ? त्यांच्याच घरीं का भांडणें होतात ? पण तुम्हांला तर त्यांच्या गोष्टी बोलल्या-खेरीज चैनच पडत नाहीं ! बातम्यांत पण एवढासा खरेपणा असेल तर शपथ ! बाई ! बाई ! या नसत्या उठाठेवी करण्यांत तुम्हांला काय भूषण वाटत असेल तें वाटो !

**रा०**–तर मग ही सगळी गोष्ट खोटीच का ?

**जा०**–मी नव्हतें का म्हणत कीं एवढ्या थरास गोष्ट जाईलसं मला वाटत नाहीं? पण मा-झ्या एकटीचं तुम्हां सर्वांपुढें काय चालतं ! माझं म्हणणं ऐकतं कोण ! म्हणतातना 'नगाऱ्याचा घाय तिथं टिमकी तुझें काय' !

**उ०**–खरं विचाराल तर मला पण बाई वाटत होतें कीं, इथं पिसाचा कावळा झाला असावा. मी तसं बोलणार पण होतें. पण माझं बाई ऐकणार कोण !

**अ०**–माझ्या पण बाई मनांत संशय येत होता.

**सा०**–वाहवाग बायांनों ! तुमच्या विचारांत हा इतका एकाएकीं फेरबदल झाला तो सावि-त्रीबाईच्या कानउघडणीनंतर नसेलना ? तसं असल्यास ठीकच ! पण मी असं म्हणणार होतें--असं म्हटलं असतं–अशा–उडवाउडवीच्या–नव्हे–केवळ खोट्यानाट्या गोष्टि बोलण्यांत काय हांशील ! तुमची मनं तुम्हांला खात असतील--व आजपर्यंत केलेल्या कर्मांचा पश्चात्ताप तुम्हांस झाला असेल तर–या अनुभवावरून कानाला खडा लावून घ्या व इतःपर दुसऱ्याच्या निरर्थक उठाठेवी करणार नाहीं असा आपल्या मनां

निश्चय करा ! परनिंदा करणें यांत मोठें पाप आहे ! आपल्या आगींत कीं दुगींत नाहीं त्याच्यासंबंधानें नानातऱ्हेच्या खोट्या वातम्या उठवून त्याबिषयीं वादविवाद करीत बसणें—त्यांत आनंद मानणें- हें एक व्यसनच तुम्हांला जडलं आहे. त्या व्यसनाच्या आधीन होऊन तुह्मी स्वतःचें व इतर बिचारे निरपराधी लोक जे दुर्दैवेंकरून तुमच्या तावडींत सांपडतात त्यांचें नुकसान करीत आहां ! त्या व्यसनापासून मुक्त व्हा. त्यांत तुमचं कल्याण आहे ! आणखीं हें पहा ! या जगांत अगदीं चोख असा एक तरी माणूस मिळणार आहे का ! कोणाला कांहीं तरी व्यंग असतंच. म्हणून प्रत्येकानें दुसऱ्याचें व्यंग काढून त्याची निंदा करण्यापूर्वी आपल्या पायाखालीं काय जळतं याचा विचार केला पाहिजे 'आपल्या डोळ्यांतील मुसळ दिसत नाहीं पण दुसऱ्याच्या डोळ्यांतील कुसळ दिसतं' ही म्हण अगदीं खरी आहे ! बायानों मी जें म्हटलं त्याचा राग मानूं नका बरं ! पुष्कळ दिवस मी तुम्हांमध्यें येतें जातें तेव्हां हे तुमचे प्रकार पाहून मला फार वाईट वाटे व तुह्मांला एक वेळ बोलून पहावं असं माझ्या मनांत पुष्कळ दिवस झाले वागत आहे. परंतु आजच्या सारखी संधि मिळाली नाहीं ! आज जेव्हां अतिच झालं तेव्हां माझ्यानें बोलल्याशिवाय रहावेना ! झालं माझं कर्तव्य मी केलं !

रा०—बायांनों, सावित्रीबाई जें कांहीं म्हणाल्या तें अक्षरशः खरं-खरं आहे ! आपला आजपर्यंतचा वर्तनक्रम फारच निंद्य होता यांत संशय नाहीं ! मी बाई यापुढें दुसऱ्याची निंदा म्हणून कधींच करणार नाहीं ! देवाची शपथ !

ज्ञा०—मी पण बाई आजपासून आपण भलं व आपलं काम भलं-परक्याच्या उठाठेवींत कधींच पडणार नाहीं ! भगवंताची शपथ !

अ०—वगैरे } आम्हींही देवाची शपथ—

सा०—भले-भले-बायानों ! हा तुमचा निश्चय देव करो आणि सिद्धीस जावो ! तुमच्या विचारांत हा फरक झालेला पाहून मला अति आनंद वाटतोय ! आज मी मोठीच कामगिरी बजावली ! शिवाय परनिंदा करणें या अति निंद्य व आपल्या स्त्रीवर्गास लांछन आणणाऱ्या दुर्गुणापासून तुम्हांला मुक्त केल्यानें तुमचा एक निंदेचा अड्डाकमी झाला हा एक समाजास लाभच झाला म्हणायचा ! असे ठिकठिकाणचे अड्डे मोडले जातील तो सुदीन खरा ! चला बाई. वेळ पुष्कळ झाला. घरीं जायचं आहे कीं नाहीं ?

**उमाबाई०**–हो बाई ! चला–बाळ्यानें त्रास दिला असेल ! चला बाई !

**अन्नपूर्णा०**–येतांच का ? बरं बाई तुमचा मुलगा लहान आहे. तुम्हांला नाहीं पण म्हणवत नाहीं. पण तुम्हांला घाई करायची जरूर नाहीं.

**रमाबाई०**–नाहीं बाई. मी पण जातें बाई. सोबत बरी आहे. ती टाकून मग एकटं जायंच–

**अन्न०**–बरं बाई. नाहींच म्हणतां तेव्हां माझा निरुपाय आहे. ( उमाबाई वगैरे निरोप घेऊन जातात. अन्नपूर्णा० दुसऱ्या स्त्रियांस हळदींकुंकुं देण्यास जातात. )

---

## अंक ४ था.

### प्रवेश २ रा.

( काकासाहेब धनाजीरावाच्या वेषानें व विसाजीपंत. )

**वे० काका**–विसाजीपंत–नानासाहेबाची परीक्षा घेण्याची तुम्हांस जरूर वाटते का ? त्याच्या विषयीं सर्व लोक वाहवाच करितात. कोणीहि एक वाईट शब्द म्हणत नाहीं.

**विसाजी**–काकासाहेब आतां थोडयासाठीं आळस कां ? कानांत व डोळ्यांत दोन बोटांचं अंतर आहे म्हणतात ना ? चक्षुर्वैसत्यं ! स्वतः खातरी करून घेण्यासारखं दुसरं कांहीं नाहीं.

**वे० काका**–ठीक तर–चला–तुम्हीं आंत जाऊन कळवा. मी बाहेर उभा रहातों.

( विसाजीपंत आंत जातात ).

**विसाजी०**–नानासाहेब त्या दिवशीं आपणांस ज्या गृहस्थाविषयीं सांगितलें ते आले आहेत. आपल्या काकासाहेबाचे मित्र.

**नाना०**–( त्रासून ) या वेळीं कोठें हें लफडं घेऊन आलां ? तुम्हांस विसाजीपंत ही वाईट खोड आहे. कामकाज–वेळ अवेळ न पहातां—

**विसाजी०**–साहेब माफी असावी–यांत माझा वांक नाहीं–आपण त्यांना आज घेऊन येण्यास सांगितलं होतं त्याप्रमाणें त्यांना घेऊन आलों. पाहिजे असल्यास पुन्हा कधीं बोलवा.

**नाना०**—बरं बरं—आपला कांहींना कांहींतरी जबाव हजर आहेच. बरं तर येऊंद्या त्यांना आंत. काय जुलूम आहे तरी हा ! मोठ्या नांवाचा हा गैरफायदा ! गरीब सोयऱ्या धायऱ्यांनां मदत केली पाहिजे. धर्माच्या लिस्टांत पैसे भरले पाहिजेत. जसं काय आमच्या पाशीं पैशाची खाण लागून गेली आहे ! अलीकडे या प्रतिष्ठित भिकाऱ्यांना फारच ऊत आलेला दिसतो. नाहीं नाहीं म्हणतां या पंधरवड्यांत अशा चार पांच जणांनीं पैसे उपटून नेले. यांना द्यावयास पैसा आणायचा तरी कोठून ! बरें येऊंद्या या आमच्या काका साहेबांच्या मित्रांना. जा आणा पाहूं. एकदांची पीडा काढून टाकूं या.

**विसाजी०**—( जातां जातां ) काकासाहेबांनीं हीं मुक्ताफळें ऐकिलीं असतीं कीं बरं होतं. असो. आणखीं काय मुक्ताफळें पडतात तीं पाहूं या. ( जाऊन काका० स घेऊन येतात. )

**वे० काकासा०**—( स्वतःशीं ) वाहवा ! ऐकत होतों तसाच प्रकार दिसतो खरा ! आणखीं परीक्षा ती काय घ्यावयाची ! विसाजीपंत—तीं चिन्हेंच वेगळीं ! नाहीं तर वाला-साहेबाकडे गेलों होतों तेव्हांचा प्रकार कसा होता ?

**विसाजी०**—काकासाहेब—हातच्या कांकणाला आरसा कशाला ? आतां लवकरच सर्व उलगडा होईल.

**नाना०**—या. या. विसाजीपंत यांना खुर्ची द्या बसायला. आपण धनाजीराव काय ? बसा—संकोच धरायचं कारण नाहीं.

**धनाजीराव०**—होय आपला नम्र सेवक—

**नाना०**—( मनांत ) नांव मोठें आणि लक्षण खोटें ! ( उघड ) माफ करा. आपणांस अंमळ बसावं लागलं—परंतु निरुपाय ! काम—काम—काम—फुरसद कशी ती बिलकुल नाहीं. बसा कीं—बसा. धनाजीराव मी आपणांस ओळखीत नाहीं परंतु आमचे विसाजी-पंत म्हणत होते कीं तुह्मीं आमच्या काकासाहेबांचे परममित्र—व नातलगही लागतां—त्यांच्या आतेच्या—सवतीचे भाचे—असंच कीं नाहीं ? हरी तूं समर्थ !

**धनाजी०**—होय. व म्हणूनच आपणांकडे मदत मागण्यासाठी आलों. नाहीं तर तसदी दिली नसती.

**नाना०**—छट्—तसदी हो त्यांत कसची ? गरीबांचा कैवारी परमेश्वर ! प्रभो तूं समर्थ ! खरोखर ! मला गरीबीनें त्रस्त झालेल्यांची फार किंव येते. आणि माझं रात्रंदिवस

देवापाशीं हेंच मागणं असतं कीं, देवा माझ्या इष्टमित्रांस गरीबीपासून कधींही त्रास नसावा. काय सांगू तुम्हांला—गरीब माणूस पाहिला म्हणजे माझं मन कसं कळवळतं अगदीं. हरी तूं समर्थ !

**धनाजी०**—थोरपणाचं हें चिन्हच होय. साहेब, विसाजीपंतांनीं माझी कर्मकथा आपणांस कळविली असेलच ?

**नानासा०**—शिव हरे ! शिव हरे ! हो तर ! मीं सर्व कांहीं जाणतों व आपली हकीगत ऐकून मला पराकाष्ठेचें वाईट वाटलं. शिव शिव ! देवा या जगांत असे दुःखी प्राणी असतांना इतरांनीं चैनींत, मौजमजेंत पैसा उडवावा हा कोणता न्याय ! हरी तुझी इच्छा खरी !

**धनाजी०**—आपणांसारखे श्रीमंत—त्यांच्या गरीब इष्टमित्रांची किंव घेणारे असल्यास मग त्यांचे हाल किती वेळ रहाणार! त्यांच्या दुःखाचा परिहार झालाच ह्मणायचा.

**नाना०**—हरी तूं समर्थ ! अहाहा ! मी खरोखर श्रीमंत असतों तर दुसऱ्या कशासाठीं नाहीं तर दुनियेंतील गरीब लोकांची नड दूर करण्यासाठीं मी माझ्या श्रीमंतीचा किती तरी उपयोग केला असता ! नाहीं तर श्रीमंत असून काय करायचं ?

**धनाजी**—आपले काकासाहेब येथें असते तर खचित त्यांनीं मला दुसऱ्या कोणाकडे जाऊं दिलें नसतें. त्यांना आपल्या गरीब इष्टमित्रांचा किती तरी अभिमान आहे सांगूं !

**नाना०**—यांत काय संशय. व मीहि आपणांबद्दल मोठ्या खुषीनें शिफारस केली असती. हरीची शपथ ! हरी ! तूं समर्थ !

**धनाजी**—किती तरी आपलं थोर मन हें ! पण त्यांच्याजवळ कोणाच्याहि शिफारसीची जरूर पडली नसती. पण ते इथें नसले म्हणून काय झालं ? आपण त्यांच्या ठिकाणीं आहांत. साहेब, गरीब इष्टमित्रांस मदत करण्यास व इतर दानधर्मांचीं कृत्यं करण्यास आपणच त्यांचे मुनिम आहांत. आपण फार धार्मिक आहांत व आपणांवर त्यांचा पूर्ण विश्वास आहे; म्हणून ते आपणांस अशा धर्मकृत्यांत खर्चण्यासाठीं म्हणून विपूल पैसा पाठवितात—असं लोकांच्या ऐकिवांत आहे.

**नाना०**—हरी हरी ! छट् देवाचं नांव. एक पईही त्यांच्याकडून मला मिळत नाहीं. कोणी लेकानें त्यांचा पांढरा कीं काळा पाहिला आहे पैसा ! हें तुम्हांला कोणीं सांगितलं ?

**धनाजी**–हरी ! हरी ! लोक म्हणतात आपला सल्ला घेतल्याशिवाय काकासाहेब कोणतेंच कार्य करीत नाहींत.

**नाना**–वाहवा ! वाहवा ! तुम्हांला कोणी तरी चांगलीच थाप दिली म्हणायची ! धनाजीराव काय सांगू तुम्हांला ? आमचे काकासाहेब धार्मिक आहेत–दयाळु आहेत–सर्व कांहीं आहेत–पण पैशाच्या बाबतींत-इतके लोभी आहेत कीं-त्यांनीं ठरविलेल्या रकमेपेक्षां एक पईहि पेढींतून घेण्यास आम्हांला सूट नाहीं. काय समजलेत ? व मी म्हणतों हें खरं कीं खोटं यास परमेश्वर साक्ष. हरी ! हरी !

**धनाजी०**–( मनांत ) हें चिन्ह कांहीं बरं दिसत नाहीं ! हा महा ठक व अट्टल लुच्चा दिसतो ! बरं पाहूं या पुढं काय होतं तें. ( उघड ) खरंच काय ? लोक तर म्हणतात कीं काकासाहेबांनीं संस्थानांतून इकडे जवाहीर वगैरे पुष्कळ पाठविलं आहे–तेंही खोटं कीं काय ?

**नाना०**–जवाहीर ! हिऱ्याची खाण बिण लागली होती कीं काय काका साहेबांनां तेथें ! कीं उचललं जवाहीर नी दिलं येथें पाठवून त्यांच्या लाडक्या पुतण्याकडे ! कोठून या बातम्या लोक आणतात परमेश्वरास ठाऊक ! हरी ! हरी ! प्रभो तूं समर्थ आहेस ! शर्थ आहे या उद्योगी लोकांची ! अहो ते दिवस आतां गेले ! पूर्वीच्या संस्थानिकांच्या कारकिर्दीत झाल्या असतील तशा गोष्टी. आतांचे संस्थानीक राजे इतके कांहीं भोळे नाहींत !

**धनाजी०**–( मनांत ) अरे ! अरे ! लबाडीवर लबाडी ! अरे या वेळीं कानांत मोठ्या दाण्यांची भीकबाळी लटकावली आहे ती लबाडाला विचारा कोणाच्या बापाची ! महाराजांनीं मागल्या दरबाराच्या वेळीं मला भेट म्हणून दिलेली. ती मला काय उपयोगाची म्हणून या लुच्चयाला वापरायला म्हणून पाठवून दिली ! हें सर्व विसरला वाटतं ! ( उघड ) तस असेल. मी रावसाहेबांशीं तकरार करायला आलों नाहीं. पण रावसाहेब. काका साहेब तिथून आपणांला तऱ्हतऱ्हेच्या जिनसा पाठवीत असत असंही लोक म्हणतात.

**नाना०**–छी: छी: तेंही खोटें. निवळ खोटें ! नाहीं म्हणायला काका साहेब कधीं गुजराथेच्या बाजूस आले तर दिवाळीच्या सुमारास गचक व रेवड्याचा करंडा पाठवीत असत. मुलांस खाऊ म्हणून-च तो पण लहानसाच.

६१९९

**धनाजी**०-( मनांत ) असं काय ! गचक रेवड्याचे करंडे काय ! बरं बरं थांब तुझी कशी रेवडी उडवितों ती. ( उघड ) या सर्व गोष्टी राहूं द्या-पण माझ्या विषयीं आपला काय विचार आहे ?

**नाना**०-अरे. अरे. मला तुम्हांस रिकाम्या हातीं जाऊं देण्यास अति-अति-दिलगिरी वाटते-हरीची साक्ष ! आणि हें पहा, माझा हात इतक्या तंगींत नसता-पण ते आमचे धाकटे बंधुराज आहेत ना ?

**धनाजी**०-त्यांचे विषयीं काय ? त्यांजकडे जाऊं म्हणतां ?

**नाना**०-( हंसून ) ठीक ! ठीक ! त्यांजकडे गेल्यास ते तुमची चांगलीच संभावना करतील ! पण मी जाणूनबुजून तुम्हांला त्यांच्याकडे पाठवूं कसा ! छः छः तसं नाहीं ! मी म्हणत होतों की त्याच्या नादानपणामुळें माझा हात जरा ओढीस आला आहे. अहो, आपलीच मांडी उघडी करून लोकांस काय दाखवायची ? नाहीं तर या बाळासाहेबानें अगदीं जेरीस जीव आणला आहे. पैशापरी पैशाची नासाडी व अब्रूचे काकडे नफ्यांत ? काय करूं ! त्याच्यासाठीं माझा जीव हळहळतो !

**धनाजी**०-( स्वगत ) आणि तुझ्यासाठीं गाढवा माझा जीव चडफडतो ! अरे गोडबोल्या ! वरं ! वरं ! अजून किती लबाड्या करतोस तें पहातों. ( उघड ) बरोबरच आहे. आपल्यासारख्या सरळमार्गी-धार्मिक बुद्धीच्या-परोपकारी-सद्गुणी माणसाच्यानें असले चाळे कसे पहावतील !

**नाना**०-आणि त्यांत काकासाहेब येथें असते तर मला विशेष काळजी नसती! त्यांची त्यांनीं जबाबदारी पाहून घेतली असती-पण त्यांनी मजवर जबाबदारी टाकली आहे. असो ! पण मला विशेष दिलगिरी ही वाटते कीं त्याच्यापाठीं पैसा खर्च करावा लागल्यामुळें-आपल्या सारख्या सत्पात्र-गरीब-माणसास विन्मुख पाठवावं लागतं.

**धनाजी**०-तर मग आपण माझ्यासाठीं कांहींच करूं शकत नाहीं ?

**नाना**०-काय करूं-नाहीं बोलण्यास तरी जिव्हा कोठें उलटते ! हर ! हर ! परमेश्वरा ! पण माझा निरुपाय आहे. यावेळीं रिकाम्या हातानें परत पाठविण्यास मला अति वाईट वाटतं पण एवढी खात्री असूं द्या कीं, पुन्हां केव्हां तरी याल तेव्हां खचित भरल्या

हातांनीं पाठवीन. मुठी भरून- खिसे भरून--पाठवीन. पैसा पैसा काय आहे ! फार काय सांगूं? जरा हात सुटा होऊंद्या. घरपोहोंचता करीन.

**धनाजी०**--( मनांत ) काय म्हणे मुठी व खिसे भरून--पण ते कशांनें पैशानें कीं वाळकेश्वरच्या धोंड्यानें ! आहारे ! शाबवाज ! कोणासारखा असा झालास ? ( उघड ) पण रावसाहेब, माझी स्थिति अगदींच कंगाल आहे. यावेळीं फुल नाहीं फुलाची पाकळी दिल्यास--

**नाना०**--असेल--मी नाहीं म्हणतों का ? बरं तर या--या बरं-- ( उठतो ) आपण रिक्तहातीं जातां हें पाहून माझं काळीज तुटतं. हर ! हर ! प्रभो ! काय हा प्रसंग ! बरं-या बरं--

**धनाजी०**--पण आपणांकडून कांहींच आशा--

**नाना०**--या बरं--परमेश्वरकृपेनें लवकर पुन्हा भेटीचा योग येवो !

**धनाजी०**--पण--

**नाना०**--विसाजीपंत--यांना वाट दाखवा.

**धनाजी०**--( जातां जातां ) पक्का ढोंगी-ठक-गोडबोल्या!नांवाजलेला पण बाळासाहेब तुझ्यापेक्षां हजार पटीनें बरा ! ( जातात. )

**नाना०**--एकदांची पीडा गेली ! प्रत्यक्ष कर्जदार पत्करतो पण हे गरीब सोयरे पत्करत नाहींत. शिवाय ते लोकांत नालस्ती करतात तें नफ्यांतच ! काकासाहेबांनीं इकडे हुंड्या नाहीं पाठविल्या कीं त्यांच्या सोयऱ्याधायऱ्यांस आम्ही पैसे पुरवावे ! ( विसाजीपंतास ) कोठं होतेत विसाजीपंत ? तुमच्या काकासाहेबांचा मित्र फारच लोचट ! कांहीं केल्या जाईना--शेवटीं जेव्हां धक्का मारून--

**विसाजी०**--हं हं-- तुम्ही त्या बिचाऱ्या गृहस्थाच्या आंगावर हात टाकलात कीं काय ?

**नाना०**--टाकला नाहीं. पण एवढं भिण्याचं कारण काय ? अं. अशा भिक्षुकांची फारशी प्रतिष्ठा ठेऊन उपयोग नाहीं. असो. पण विसाजीपंत हें पत्र कोणाचं घेऊन आलां ?

**विसाजी०**--अरे हो ! बोलण्याच्या भानांत विसरलों--काय वाटतं नानासाहेब--पत्र कोणाचं असावं ? काकासाहेबांचं ! काकासाहेब आज रात्रीच्या गाडीनें येताहेत ?

**नाना०**–काय म्हणतां ! काकासाहेब आजरात्रीं येणार ? मग इतका वेळ स्तब्ध कां बसलां होतां ? सर्व कामांत असाच तुमचा घोंटाळा. धांवा पाहूं. त्या गृहस्थाला परत बोलावून आणा पाहूं. धांवा. तो दूर गेला नसेल अजून–धांवा–

**विसाजी०**–ते आतां कसचे परत येतात. ते केव्हांच गेले.

**नाना०**--छट् छट् ! काय घोटाळा केलात तुम्ही तरी ! त्याला जाऊं कां दिलात ? असो ! तुम्हांला तरी दोष कां देऊं ! माझेच दिवस वांकडे आले आहेत असं दिसतं. सर्वच विपरीत घडून येत आहे ! आतां तुमचे धनाजीराव काकासाहेबांना भेटून त्यांना काय सांगतील नी काय नाहीं ! दुसरीकडून तात्यासाहेब आहेतच त्यांचं गार्‍हाणें सांगायला तयार. मिळून सर्व बाजूनें फटफजीतीचा वेळ आला आहे खरा. यांतून अब्रू कशी वांचते हें एक परमेश्वरासच माहीत ! प्रभो ! तूं लज्जा रक्षण करणार समर्थ आहेस ?

( जातात. )

---

# 'ढोंगी दुनिया'

### अर्थात्

## 'जें सारें चकाकतें तें सोनें नव्हे'.



( लेखक–रा. गणपतराव सोकरजी त्रिलोकेकर. )

( मागील अंकावरून पुढें चालू. )

### अंक ४ था–प्रवेश ३ रा.

( विसाजीपंत व सावित्रीबाई. )

**वि०**–( हिशेब करीत असतां ) अरे–अरे–किती तरी हा खर्च त्या ढोंगी बुवाच्या नादीं लागून बाईसाहेबांनीं केला ! अजून तरी किती व्यापारी लोकांचे आंकडे चुकवायाचे आहेत ! मघाच तो रेशमी कापडवाला चडफडून गेला ! दुसऱ्या व्यापाऱ्यांनींही एक सारखा तगादा लाविला आहे ! हा सर्व प्रकार तात्यासाहेबांच्या कानांवर घातल्यास ते फारच रागावतील; पण त्यांच्या कानांवर घातल्यावांचून गत्यंतर नाहीं ! मागेंपुढें तसं करावं लागणारच ! आंकडे लहानसहान रकमांचे नाहींत व या मोठाल्या रकमा त्यांच्या हुकूमाखेरीज खर्ची कशा घालणार ? बरं पाहूं या ! तशीच संधि पाहून तबीयत संभाळून, काम साधलं पाहिजे. उतावीळ करण्यांत हांशील नाहीं–

( इतक्यांत सावित्रीबाई येतात. )

**सावित्री०**–ऐकली का गंमत ?

**वि०**–( त्रासानें ) तुम्हां बायकांना काय सदा सर्वदां गंमत नी मजा ! आम्हांला काळजी किती तरी वहावी लागते याचा विचार तरी !

११२०३

**सावित्री०**–अगबाई ! हें आज असं काय ! तुम्हा पुरुषांना काळजी नाहीं असं कोण म्हणतंय ! पण त्यांतल्या त्यांत आनंद मानावा म्हणजे भार हलका होतो दुसरं काय ! पण कां वरं–आज इतका त्रास होण्याला काय झालं ? कांहीं कमीजास्त झालं कीं काय ?

**वि०**–कमी काय नी जास्त काय ! स्त्रियांच्या अविचाराचीं फळें ! आणखीं काय ?

**सावित्री०**–स्त्रियांच्या अविचारांचीं फळें ! कोणत्या त्या स्त्रिया ? असं मोघम बोलून काय समजणार !

**वि०**–मोघम नाहीं–उघड बोलतों–बाईसाहेबांनीं केलेल्या अविचाराचे हे परिणाम ! —त्यानीं ढोंगी बुवाच्या नादीं लागून शेकडों रुपयांचा खर्च केला–आतां कर्जदार तगादा लावताहेत ! इतके दिवस थांबवून घेतले ! आतां नाहीं ऐकत. तेव्हां तात्यासाहेबांच्या कानांवर ही गोष्ट घालावी न घालावी या विचारांत होतों. दोनहीकडून पंचाईत !

**सावित्री०**–मी आधींच नव्हतें का म्हणत कीं तात्यासाहेबांच्या कानावर गोष्ट घाला ? तसं केलं असतं तर केव्हांच बंदोबस्त होऊन गेला असता !

**वि०**–काय उपयोग झाला असता ! त्यावेळच्या बाईसाहेबांसमोर कोणाचं चालत होतं ! कोणाची प्राज्ञा होती कीं एक शब्द बोलेल ! तात्यासाहेबही त्यांच्यासमोर कसे अगदीं मऊ होऊन गेले होते ! व ते पण त्या बुवाच्या नादीं लागले नव्हते का ? मग काय उपयोग झाला असता माझ्या कानउघडणीचा ?

**सावित्री०**–हो असं तर खरंच ! पण तें असो ! बरी आठवण झाली. मला आपणांस एक गोष्ट विचारावयाची आहे. सांगाल का ?

**वि०**–चला–काय विचारायचं असेल तें घ्या एकदाचं विचारून-हं आटपा–

**सावित्री०**–हो, हो ! इतकी धांदल करायची कांहीं जरूर नाहीं. आतां कुठं जायचं तर नाहीं. मी म्हणतें–मारवाडी पूरनमल व धनाजीराव–हे कुणी भाऊबंदांपैकीं आहेत कीं काय ?

**वि०**–( हंसून ) वेडी–अगदीं वेडी कुठची ! एक मारवाडी दुसरा दक्षणी गृहस्थ ! हे भाऊबंद कसे होणार ! हीच का तुमची अक्कल ! काय म्हणत्येस याचा विचार तरी केलास काय ?

**सावित्री०** असं--असं -मी आपली वेडी ! पण मला वेडी म्हणा किंवा शहाणी म्हणा, मला या सगळ्या कामांत कांहीं तरी गोम आहे असं खचीत वाटतं ! आणखीं मारवाडी लालाजी व धनाजीराव हे वेगळे नसून—

**वि०**–हं-हं-वेडे ! हें काय बोलत्येस ? हळू-हळू–मोठ्यानें नको ! कोणी ऐकेल.

**सावित्री०**–असं-असं. नाक दाबल्याखेरीज तोंड उघडत नाहीं म्हणतात तें हें ! आतां कसं आपोआप बाहेर पडलं ! नाहीं तर किती तरी आढे वेढे घेतले होते ! बरं तर ! एक गोष्ट झाली. आतां हें प्रकरण काय आहे ? हीं सोंगेंढोंगें कशासाठीं ? मला सांगायला हरकत आहे का ?

**वि०**–हें पहा ! अति सर्वत्र वर्जयेत्--ऊंस गोड झाला म्हणून मुळासुद्धां खाऊं नये. समजलं तेवढ्यांत संतोष मानावा व स्वस्थ बसावं. तशांत लवकरच सारं आपोआप समजेल !

**सावित्री०**–यांत तें काय मला नवीन समजलं ? हें मी जाणतच होतें ! तुमच्याकडून मात्र खातरी करून घेतली. मला नाहीं का सांगायचं ?

**वि०**–( मनांत ) इनं तर माझा जीव खाल्ला अगदीं ! इला जर मी न सांगेन तर ही मला स्वस्थ बसूं देणार नाहीं ? पाठ पुरवून माझा जीव बेजार करील ! बरं पण आतां इला ती गोष्ट सांगण्यास हरकत कोणती ? आज रात्रींच आपोआप सगळा उलगडा होणार आहे; व इतःपर ही गोष्ट गुप्त ठेवण्याचें प्रयोजनही विशेष आहे असं वाटत नाहीं. तेव्हां इला सांगून टाकावें. आणखीं काय ! व त्यामुळें कोणाचं नुकसान होणार नाहीं व इच्या मनास समाधान वाटेल. इतकंच नव्हे तर इला मोठेपणाही दिल्या सारखं होईल ! सांगावं तर—( उघड ) हें बघ–मी तुला म्हणून सांगतों. दुसरी एखादी स्त्री असती तर विचार करण्यासारखी गोष्ट असती–परंतु तुझ्याविषयीं माझी पूर्ण खातरी आहे.

**सा०**–हो, हो ! इतकं कांहीं नको. अगदीं उघडं पडण्याची वेळ येऊन ठेपली तेव्हां सांगायला तयार झालेत. आतां [illegible]

वि०--( मनांत ) अरेच्चा ! कोणतीही शकल काढा--इच्या पुढें सारं लटपटतं--जबरी खरी ! ( उघड ) तें कांहींही असो. तुझी ऐकण्याची इच्छाच जर आहे तर ऐक. पण संभाळ बरं--गोष्ट षट्कर्णी झाली न पाहिजे !

सा०--मला तें सांगायला हवं का ? तसा तुमचा विश्वास नसेल तर नका बाई सांगूं. आपोआप कळेल असं तुम्हीच म्हणालांत ना ? झालं मग. मग तुमचा तरी एवढा मोठेपणा कशाला हवा !

वि०-हो, हो, हो ! इतकं कांहीं गरम व्हायला नको. अंमळ स्वस्थतेनें घ्या--अगदींच उतावळा स्वभाव तुम्हां बायकांचा !

सा०--बोला, बोला. आम्हीं बायका उतावळ्या--आम्हीं द्वाड. जगांत जेवढं म्हणून वाईट आहे तेवढं आम्हां बायकांत भरलं आहे. बोला. तुमच्या पदरीं पडलों तेव्हां निमूटपणें ऐकून घेतलं पाहिजे. अणखीं काय !

वि०--( हंसून ) अहाहा ! असा जर तुम्हां बायकांनीं निश्चय केला तर नवरेबायकांतील शेंकडा नव्याण्णव तरी भांडणें मिटतील. तोंडास तोंड देऊन वाद वाढविणें व शेवटला शब्द आपलाच ठेवणें हें बायकांचें ब्रीद महशूरच आहे.

सा०--हा आणखी आरोप आम्हांवर ! आम्हीं भांडणें वाढवितों. आणखीं तुम्ही मात्र तोंडास खीळ घालून स्वस्थ बसतां. वाहवा !

वि०--बरं. आतां वाद पुरे झाला ! तुला ऐकणं असेल तर असा कान पुढें कर पाहूं. भिंतीसही कान असतात.

( सावित्रीच्या कानांत सांगतात. )

सा०--( आश्चर्यानें ) अगबाई--काय म्हणतां ? खरंच कीं काय ? वाहवा ! म्हातारा जबरा खरा ! शाबास--बाई--पुतण्यांची परीक्षा करण्याची युक्ती काकासाहेबांनीं नामी काढली म्हणायची ! मग शेवटीं काकासाहेबांच्या कसोटीस कोण उतरले ? नानासाहेब किं बाळासाहेब ?

वि०--तें मी कांहीं सांगूं शकत नाहीं. तें त्यांचं पहाणें आहे ! काका आहेत आणि त्यांचे पुतणे आहेत !

सा०-बरं नका सांगूं. कुत्र्याचें शेंपूट वांकडें तें वांकडें ! नका सांगू तर ! आम्हांला आ-पोआप समजेल ! तुम्हांला तरी एवढा मोठेपणा कशाला देऊं ! चला बाई--तुमच्याशीं बोलत बसून हांशील नाहीं. (जाते.)

वि०-वहारे ! आहे कीं नाहीं मजा ! याला म्हणतात बायकांचा चाणाक्षपणा व चातुर्य! पोटांत शिरून आपला मतलब साधून शेवटीं टोमणा वर आहे तो आहेच ! आहा ! परमेश्वरानें स्त्री ही एक अजब वस्तु निर्माण केली आहे यांत संशय नाहीं ! अरे पण मी येथें बसून काय राहिलों ! काकासाहेब आज प्रगट होणार ! तेव्हां तेथें हजर राहिलें पाहिजे ! चला ! वेळ होत आली. (जातात.)

---

## अंक ४ था–प्रवेश ४ था.

(स्थल–नानासाहेबांची खोली.)

नानासाहेब०-(स्वगत) सर्व ठिकाणीं पहा फांसा कसा उलटा पडला तो ! आजपर्यंत सर्व कामांत फत्तेह तर राहिली एकीकडे, पण उलटी फट्फजिती ! तात्यासाहेबांजवळ आतां कवडीचीही प्रतिष्ठा राहिली नाहीं. आईसाहेबांसमोरही तोंड दाखविण्यास जागा नाहीं ! बरं त्यांच्या नादीं लागल्यामुळें सुशीलेकडे दुर्लक्ष झालें. त्यामुळें तिच्यासंबंधानेंही आतां आशा ठेवणें व्यर्थ ! सारांश, चारही कडून तोटा ! आतां काकासाहेबासंबंधानें काय होतं तें पहाणं आहे ! चमत्कार पहा ! ते पण अशा वेळीं कोठें यावयाला झाले ! येथली सारी आग विझाल्यानंतर आले असते तर ! पण तसं होतं कसं ! आमचं नशीब शिकंदर पडलं ना ! असो तेवढी बाजू जरी संभाळली तरी दगडापेक्षां वीट मऊ ! पण त्याचींही हीं चिन्हें ठीक दिसत नाहींत! त्यांना स्टेशनावर भेटणें अवश्य होतें. पण त्या विसाजीपंतानें गाडीची वेळ वगैरे कांहींच कळविलं नाहीं. बाळासाहेब वगैरे त्यांना भेटण्यास स्टेशनावर जातील व मी नाहीं हें पाहून माझ्याविषयीं त्यांना काय वाटेल बरं ! मी बेपर्वा आहें असं त्यांना वाटणार नाहीं काय ? शिवाय, माझ्या गैरहजरीचा लाभ घेऊन बाळासाहेब माझ्याविषयीं त्यांच्या मनांत नाहींनाहीं तें घालून देईल ! व त्यांचे कान भरील ! अरे ! अरे ! ही फार वाईट गोष्ट झाली ! हा

सगळा त्या विसाजीपंतानें घोटाळा केला ! बरं. येऊंदे काकासाहेबांना ! पहिल्यानें त्यांचीच तळी उचलतों.

( इतक्यांत काकासाहेब येतात. )

अरे हा समोरून कोण येत आहे बरं ? धनाजीराव तर नाहीं ? हो तोच. जरा पोषाक इस्कीचा करून येथें कां येत आहे बरं ? कांहो ! धनाजीराव–तुम्हांला सांगितलें ना, कीं सध्यां कांहीं नाहीं होत माझ्या हातून म्हणून ?

**धनाजी०**–साहेब मी आपणांला तसदी देण्यास आलों नव्हतों. मी ऐकलें कीं माझे परम मित्र आपले काकासाहेब आज येणार. तेव्हां तसाच धांवत आलों त्यांना भेटावयाला.

**नाना**–हो ! हो ! काकासाहेबांनीं तेथून गांसड्या आणल्या आहेतना तुमच्यासाठीं! गृहस्था एवढी घाई काय होती ? यावयाचें होतें सावकाश. बेअकली कोठचा !

**धनाजी०**–खरंच. म्हणतातना गरजवंता अक्कल नाहीं. मी म्हटलं माझी ही स्थिति पहातां-क्षणीं काकासाहेबांस दया येईल व माझें नशीब कदाचित् उघडेल !

**नाना०**-खरंच. पातेऱ्या खालीं तुझं इतके दिवस झांकलेलं नशीब आतां उघडणार खचीत! गृहस्था आतां तूं बऱ्या बोलानें जातोस कीं— ( अंगावर जातात. )

( इतक्यांत बाळासाहेब येतात. )

**बाळा०**-अरे-अरे–हें काय मांडलं आहेस नानासाहेब ! कोठें आहेत ते काकासाहेब ? विसाजीपंतांनीं त्यांना भेटण्यासाठीं म्हणून मला येथें पाठविलें आणि येथें येऊन पहातों तों तुझी या गृहस्थाशीं मारामारी नी धक्काबुक्क्या !

**नाना०**–कोठें गेले ते विसाजीपंत ? त्यांचाच हा सगळा घोंटाळा. या धनाजीला मजपाशीं त्यांनींच आणला. याला कितीदां तरी जा–जा–सांगतों. पण बिलकूल कसा तो ऐकत नाहीं–एखाद्या लोचट माणसासारखा.

**बाळा०**–अरे पण बसूंदे त्या गरीबाला. तो आपलं काय घेऊन जातो !

**नाना०**–भलतंच नाहीं तर ! आज इतक्या वर्षांनीं काकासाहेब येणार तों सक्रुद्दर्शनीं हें भिकारडं रडव्या तोंडांचं सोंग पुढें उभें ! कां–धनाजीराव चालते होतां कीं—

**बाळा०**–हे कोण म्हणतोस ? धनाजीराव ? मी हा चेहरा खचीत कोठेंतरी पूर्वी बघितला आहे. अरे हो ! पूरनचंद मारवाडी ! कां लालाजी ?

**नाना०**–अरे चल वेड्या. हे धनाजीराव–विसाजीपंत घेऊन आलेले.

**बाळा०**–आणि मी म्हणतों. हे पूरनचंद लालाजी–विसाजीपंत घेऊन आलेले मारवाडी सावकार !

**नाना०**–कधीं असं होणार नाहीं !

**बाळा०**–मग एकतर आपल्या दोघांच्या डोळ्यांस कांहीं तरी विकार झाला असावा, किंवा हा कोणी तरी भामटा, महाठक असावा ! कां धनाजीराव ऊर्फ पूरनचंद लालाजी, यावर आपलं काय म्हणणं आहे ?

**नाना०**–बाळासाहेब, ही वेळ आतां खुलासा घेण्याची नाहीं. काकासाहेब आतां येथें येतील. त्यांचं अशा रीतीनें आगतस्वागत करावयाचं काय ? अहो ! तुम्हीं धनाजीराव असा किंवा पूरनचंद असा–माझें हात जोडून तुम्हांस सांगणें आहे कीं, येथून आंताच्याआतां चालते व्हा पाहू कसे ते.

**बाळा०**–आणि लालाजी, माझी साष्टांग नमस्कार घालून अशी विनंती आहे कीं, आपण आतां येथून गच्छंती कराल तर बरं.

**काका०**–पण साहेब–

**नाना०**–छ ! हा येथून कसचा जातो–

**बाळा०**–याची मी उचलबांगडीच करतों–

**काका०**–साहेब, मी हात जोडून विनंती करतों–

**नाना० व बाळा०**–लबाडा, तुला हात धरून बाहेर काढतों–

**काका०**–अरे, अरे !

( तात्यासाहेब इत्यादि मंडळी येते. )

**तात्या०**–अरे, अरे ! काकासाहेब, हें काय ? बाळासाहेब, हें काय मांडलं आहे ?

**बाळा०**– }
**नाना०**– } कोण ? काकासाहेब !

**तात्या०**–वाहवा, काकासाहेव पुष्कळ वर्षांनीं पुतण्यास भेटण्यास आलांत, तर पुतण्यांनीं तुमचं चांगलं आगतस्वागत केलं म्हणायचं !

**काका०**–नाहीं. हा यांचा वांक नाहीं ! तात्यासाहेब, हा वेष मला श्रेयस्कर पडला नाहीं. धनाजीरावाच्या वेषानें त्या लवाड ठकाकडे गेलों तो त्याच्याकडून एक छदामही काढूं शकलों नाहीं. मारवाडी सावकाराच्या वेषानें त्या लफंग्याकडे गेलों तों त्यानें माझ्या समक्ष माझ्या वाडवडिलांचें लिलांव करून टाकिलें ! तात्यासाहेब, यांना मी माझ्या मुलांसारखे मानीत होतों व यांच्यांतच माझा सर्व जीव–प्राण––आशा होती. व हेच माझे वारस होणार होते. परंतु आतां मला विचार पडला आहे. दोनही दोन तऱ्हेचे ! पण यांनांच विचारून पाहूं या. कां गोडबोले साधू महाराज ! त्या धनाजीजवळ आपणचना गाऱ्हाणं केलंत कीं तुमचे काकासाहेब पैशाचे अति लोभी, व आपणांलाच का ते रेवड्यांचे करंडे पाठवीत असत ? गृहस्था, किती तरी हा कृतघ्नपणा ! आजपर्यंत तर रेवड्या दिल्या नाहीं; पण आतां मात्र खरा रेवड्या वांटण्याचा प्रसंग आला आहे !

**तात्यासाहेब०**–काकासाहेब ! या "देव देव"करणाऱ्या ढोंग्याच्या बाहेरील थाटमाटावर व धार्मिकपणाच्या सोंगढोंगावर विश्वास ठेऊन आपण सर्व फसलों ! व अशा सोंगढोंगाच्या पांघरूणाखालीं मतलबी व कावेबाज माणसास आपला हेतु पार पाडण्यास किती सुलभ पडतें हें नानासाहेबाच्या वर्तनक्रमावरून दिसून येतें !

**आनंदी०**–व असे साधू बाहेरून मोठ्या शुद्ध आचरणाचा आव घालून भोळ्या व अविचारी स्त्रियांस कसे फसवितात हें आपण याच्या वर्तनापासून शिकण्यासारखें आहे !

**नाना०**–आतां तुमच्या हातांत सांपडलों तेव्हां बोलून घ्या हवं तसं. काकासाहेब, परमेश्वर साक्ष–

**काका०**–चूप ! मूर्खशिरोमणि ! परमेश्वराचें नांव तुझ्या अपवित्र वाणीनें उच्चारून व्यर्थ आणखीं पापांत कां पडतोस ? तुझें सर्व ढोंग उघडकीस आलें आहे. तुझे सर्व पराक्रम मला कळले आहेत. तुझ्यांत असा एकही गुण दृष्टीस पडत नाहीं कीं ज्याच्या योगानें तुझ्या इतर अवगुणांवर झांकण पडेल व तूं पुढें सुधारशील अशीही आशा बाळगणं व्यर्थ आहे. गाढवा, माझ्याकडून आतां तुला पैचीही आशा नको !

बाळा०-आतां आमची पाळी येत आहेसं वाटतं. नानासाहेबांना सजा झाली ! आमचं काय होतें तें पाहिलं पाहिजे. काकासाहेब-

काका०-थांब, थांब, तुझाही समाचार घेतों. तूं अद्याप कोठें सुटला आहेस ! कां आपलं काय म्हणणं आहे ? बंधूसारखेच आपणही निरपराधी कीं नाहीं ?

बाळा०-नाहीं ! मी निरपराधी नाहीं. मी माझा अपराध कबूल करतों व तसें करण्यास मला लज्जाही वाटत नाहीं.

नाना०-बरोबरच आहे ! निर्लज्ज माणसास लाज कोठून असणार !

बाळा०-काकासाहेब, मी करूं नये पण माझ्या पूज्य वाडवडिलांचा जाणूनबुजून अपमान केला खरा ! पण त्यांच्या तसबिरी कां विकल्या हें आपण जाणत आहांच ! दारिद्र्यानें नाडलेला-मग तो मित्र असो कीं शत्रु असो-सोयरा असो कीं परका असो-असा माणूस पाहिला किंवा अशाविषयीं ऐकलें असतां माझं मन कसं अगदीं कळवळून जातं. तशांत तो आपला मित्र. तेव्हां त्याच्याकरितां तसबिरी तर काय पण माझा जीवही गहाण ठेवण्यास मागें पुढें पाहिलें नसतें. हें मी तुमच्या तोंडापुरतं बोलतों कीं खरं बोलतों याविषयीं आपण मारवाडी लालाजीच्या वेषानें आलां होतां तेव्हां आपली खातरी झाली असेलच ! व आपण समजून चुकलां असालच कीं, मी एकवचनी व मला आंत एक व बाहेर दुसरें याचा मोठा तिटकारा आहे. झालं. हा माझा खुलासा ! या उपरांत आपण जी सजा कराल ती भोगण्यास मी तयार आहें.

काका०-गाढवा तूंही अति कडक शिक्षेस पात्र आहेस ! तुला सजा करतों ती ही कीं-ये पाहूं पुढें-मला कडकडून भेट पाहूं एकदां-( भेटतात )--ही सजा !

नाना०-पक्षपात ! पक्षपात ! एकतर्फी न्याय ! एकतर्फी न्याय !

काका०-चूप ! कंबख्त कोठचा ! तुझ्या हातानें तूं आपला घात करून घेतलास ! तुझी करणी तुला नडली. ( बाळा० स. ) तुझें माझ्यावरील प्रेम पाहून मला फार आनंद झाला आहे व तें प्रेम कसोटीस उतरल्यामुळें तो आनंद दुणावला आहे. तात्यासाहेब, याच्यावर लहानपणापासूनच माझी मर्जी. परंतु याच्याविषयीं त्या ठकबाज्यानें नेहमीं कांहीं तरी गाऱ्हाणं लिहावं व तुमचेही त्याच्याविषयीं मधून मधून निराशेचे व दिलगिरीचे विचार लिहून येत असत त्यामुळें मन संशययुक्त झालें होतें. परंतु आतां

माझा सारा संशय फिटला ! बाळासाहेब ! तुम्ही मला दोन शब्द सांगितले पाहिजेत- परोपकार करणें उत्तम खरं--परंतु त्यांतल्यात्यांत विचार केला पाहिजे ! घरच्या मुलांस उपाशीं टेऊन उपाध्यास शिधा देणें हें केवळ शहाणपणाचें काम नव्हे ! स्वार्थ साधून परमार्थ जो साधतो त्यालाच धूर्त ह्मणतात. असो ! तरुणवयांत जो अविचार झाला तो झाला. आतां माझी वृद्धावस्था झाल्यामुळें मला आपल्या पेढीचें काम चालविणें शक्य नाहीं. तेव्हां आपल्या पेढीचे विश्वासु मुनीम व आपल्या कुटुंबाचे हितचिंतक विसाजीपंत यांच्या मदतीनें तूं पेढीचा कारभार चालीव. व माझें म्हतारपण सुखसमाधानांत जाईल अशा रीतीचें वर्तन ठेव. माझ्या नंतर सगळ्याचा मालक तूंच.

**तात्या०**—काकासाहेब, आपण बाळासाहेबांस आपला वारस केलात हें ठीकच झालें. आतां आपला इतके दिवस मित्रत्वाचा संबंध आहे तो घट्ट होऊन कायम रहावा ह्मणून आपल्या कुटुंबाचाही संबंध जोडावा असें माझ्या मनांत फार आहे. सबब आमची सुशीला आपण पदरीं घ्यावी अशी माझी आपणांस विनंती आहे.

**नाना०**—अरे ! अरे ! हें आणखीं काय ! ही पण हातांतून निसटून चालली ! प्रभो ! तूं समर्थ !

**काका०**—वाहवा ! दुधांत साखर ! फार नामी गोष्ट ! माझी पण तशीच इच्छा आहे ! यापेक्षां जास्त तें काय पाहिजे ! खरं ह्मटलं असतां सुशीलेसारखी नांवाप्रमाणें खरीच सुशील व सद्गुणी बायको मिळण्याएवढी या गाढवाची योग्यता कोठें आहे ! पण असो ! तिच्या संगतीनें तो मार्गास लागून पुढें रीतीनें चालेल व दोघें मिळून माझा वृद्धापकाळ मला सुखावह होईल असंच करतील ! ठीक ! ठीक ! सुशीले—अशी पुढें ये पाहूं. आजपासून तूं आमची सून बरं ! तुम्हीं दोघें माझं ह्मातारपण सुखावह होईल अशा रीतीनें वागा ! परमेश्वर तुमचं कल्याण—कल्याण करील !

**तात्यासाहेब वगैरे**—तथास्तु ! तथास्तु ! ! तथास्तु ! ! !

समाप्त.

